दादा भगवान कथित

# चमत्कार

मूळ गुजराती संकलन : डॉ. नीरूबहन अमीन

अनुवाद : महात्मागण

# त्रिमंत्र





नमो अरिहंताणं

नमो सिद्धाणं

नमो आयरियाणं

नमो उवज्झायाणं

नमो लोए सव्वसाहूणं

एसो पंच नमुक्कारो,

सव्व पावप्पणासणो

मंगलाणं च सव्वेसिं,

पढमं हवइ मंगलम् ॥१॥

ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥२॥

ॐ नमः शिवाय ॥३॥

जय सच्चिदानंद





# दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित पुस्तके

## मराठी

१. भोगतो त्याची चूक
२. एडजस्ट एवरीव्हेर
३. जे घडले तोच न्याय
४. संघर्ष टाळा
५. मी कोण आहे ?
६. क्रोध
७. चिंता
८. प्रतिक्रमण
९. भावना सुधारे जन्मोजन्म
१०. कर्माचे विज्ञान
११. पाप-पुण्य
१२. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार
१३. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार
१४. समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य
१५. मानव धर्म
१६. मृत्युवेळी, आधी आणि नंतर
१७. सेवा-परोपकार
१८. दान
१९. त्रिमंत्र
२०. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
२१. चमत्कार
२२. सत्य-असत्याचे रहस्य
२३. वाणी, व्यवहारात
२४. पैशांचा व्यवहार

## हिन्दी

१. ज्ञानी पुरुष की पहचान
२. सर्व दु:खों से मुक्ति
३. कर्म का सिद्धांत
४. आत्मबोध
५. मैं कौन हूँ ?
६. वर्तमान तीर्थकर श्री सीमंधर...
७. भुगते उसी की भूल
८. एडजस्ट एवरीव्हेयर
९. टकराव टालिए
१०. हुआ सो न्याय
११. चिंता
१२. क्रोध
१३. प्रतिक्रमण
१४. दादा भगवान कौन ?
१५. पैसों का व्यवहार
१६. अंत:करण का स्वरूप
१७. जगत कर्ता कौन ?
१८. त्रिमंत्र
१९. भावना से सुधरे जन्मोंजन्म
२०. प्रेम
२१. माता-पिता और बच्चों का व्यवहार
२२. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य
२३. दान
२४. मानव धर्म
२५. सेवा-परोपकार
२६. मृत्यु समय, पहले और पश्चात
२७. निजदोष दर्शन से... निर्दोष
२८. पति-पत्नी का दिव्य व्यवहार
२९. क्लेश रहित जीवन
३०. गुरु-शिष्य
३१. अहिंसा
३२. सत्य-असत्य के रहस्य
३३. चमत्कार
३४. पाप-पुण्य
३५. वाणी, व्यवहार में...
३६. कर्म का विज्ञान
३७. आप्तवाणी - १ से ८ और १३ (पूर्वार्ध)
३८. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (पूर्वार्ध-उत्तरार्ध)

★ दादा भगवान फाउन्डेशन द्वारे गुजराती, हिन्दी आणि इंग्रजी भाषेत सुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहे. वेबसाइट www.dadabhagwan.org वर सुद्धा आपण ही सगळी पुस्तके प्राप्त करू शकता।

★ प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि इंग्रजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित होत आहे.

## दादा भगवान कोण?

जून १९५८ संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. रेल्वेच्या प्लेटफॉर्म नंबर तीनच्या बाकावर बसलेल्या श्री अंबालाल मूळजीभाई पटेल रुपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरुपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रकट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्भूत आश्चर्य! एका तासात विश्वदर्शन लाभले! मी कोण? भगवंत कोण? जग कोण चालवत आहे? कर्म म्हणजे काय? मुक्ती कशाला म्हणतात? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांची रहस्ये संपूर्णपणे प्रकट झाली. अशाप्रकारे निसर्गाने विश्वाला प्रदान केले एक अद्वितीय, संपूर्ण दर्शन आणि ह्याचे माध्यम बनले अंबालाल मूळजीभाई पटेल, जे होते गुजरातच्या चरोतर जिल्ह्यातील भादरण गावचे पाटील, कॉन्ट्रॅक्टचा व्यवसाय करणारे आणि तरीही पूर्ण वीतराग पुरुष.

त्यांना प्राप्ती झाली तशी ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षुनां सुद्धा आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्भूत ज्ञान प्रयोगाद्वारे. त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हटले जाते. अक्रम म्हणजे क्रमाशिवायचा आणि क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढणे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!

ते स्वत: प्रत्येकाला 'दादा भगवान कोण?' ह्याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, ''हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर ए.एम. पटेल आहेत. आम्ही ज्ञानीपुरुष आहोत आणि आत प्रकट झाले ते दादा भगवान आहेत. दादा भगवान तर 'चौदालोक'चे नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रुपात आहेत आणि 'येथे' माझ्या आत संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! माझ्या आत प्रकट झालेले 'दादा भगवान' यांना मी पण नमस्कार करतो.''

व्यापारात धर्म असावा परंतु धर्मात व्यापार नसावा. या सिद्धांताने त्यांनी आपले संपूर्ण जीवन व्यतीत केले. संपूर्ण जीवनात त्यांनी कधीही, कोणाकडूनही पैसे घेतले नाहीत, उलट स्वत:च्या व्यवसायातून झालेल्या फायद्यातून भक्तांना यात्रा करवित असत.

## आत्मज्ञान प्राप्तीची प्रत्यक्ष लींक

मी तर, काही लोकांना माझ्या हातून सिद्धि प्रदान करणार आहे. नंतर कोणीतरी हवा की नको! नंतर लोकांना मार्ग तर हवाच ना?

**- दादाश्री**

परम पूज्य दादाश्री गावोगावी, देशविदेश परिभ्रमण करून मुमुक्षुंना सत्संग आणि आत्मज्ञानाची प्राप्ती करवित होते. दादाश्रींनी आपल्या हयातीतच पूज्य डॉ. नीरूबहन अमीन (नीरूमा) यांना आत्मज्ञान प्राप्त करवून देण्याची ज्ञानसिद्धी प्रदान केली होती. दादाश्रींच्या देहविलयानंतर नीरूमा त्यांच्याप्रमाणेच मुमुक्षुंना सत्संग व आत्मज्ञानप्राप्ती निमित्त भावाने करवित असत. पूज्य दीपकभाई देसाई यांना दादाश्रींनी सत्संग करण्याची सिद्धी प्रदान केली होती. पू. नीरूमांच्या उपस्थितीतच त्यांच्याच आशीर्वादाने पूज्य दीपकभाई देश-विदेशात कित्येक ठिकाणी जाऊन मुमुक्षुंना आत्मज्ञानप्राप्ती करवून देत होते, हे कार्य नीरूमांच्या देहविलयानंतर आजसुद्धा चालूच आहे. या आत्मज्ञानप्राप्ती नंतर हजारो मुमुक्षु या संसारात राहून, सर्व जबाबदाऱ्या सांभाळत असताना सुद्धा मुक्त राहून आत्मरमणतेचा अनुभव घेत आहेत.

पुस्तकात मुद्रित वाणी मोक्षार्थीला मार्गदर्शनासाठी अत्यंत उपयोगी सिद्ध होईल, परंतु मोक्षप्राप्तिसाठी आत्मज्ञान प्राप्त करणे गरजेचे आहे. अक्रम मार्गाने आत्मज्ञानप्राप्तीचा मार्ग आजसुद्धा मोकळा आहे. जसा प्रज्वलित दिवाच दुसऱ्या दिव्याला प्रज्वलित करू शकतो, त्याचप्रमाणे प्रत्यक्ष आत्मज्ञानींकडून आत्मज्ञान प्राप्त करूनच स्वत:चा आत्मा जागृत होऊ शकतो.

## निवेदन

परम पूज्य 'दादा भगवान' यांच्या प्रश्नोत्तरी सत्संगात विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे देताना त्यांच्या श्रीमुखातून अध्यात्म आणि व्यवहार ज्ञानासंबंधी जी वाणी निघाली, ती रेकॉर्ड करून, संकलन व संपादन करून पुस्तकांच्या रुपात प्रकाशित केली जात आहे. त्याच साक्षात सरस्वतीचे अद्‌भूत संकलन ह्या पुस्तकात झाले आहे, जे आम्हा सर्वांसाठी वरदानरुप ठरेल.

प्रस्तुत अनुवादाची वाक्यरचना मराठी व्याकरणाच्या मापदंडावर कदाचित खरी ठरणार नाही, परंतु दादाश्रींच्या गुजराती वाणीचे शब्दश: मराठी अनुवाद करण्याचा प्रयत्न केलेला आहे, की जेणे करून वाचकांना असा अनुभव व्हावा की दादाजींचीच वाणी ऐकली जात आहे. पण तरीसुद्धा दादाश्रींच्या आत्मज्ञानाचे अचूक आशय, जसे आहे तसे तर तुम्हाला गुजराती भाषेतच अवगत होईल. ज्यांना ज्ञानाचा गहन अर्थ समजून घ्यायचा असेल, ज्ञानाचा खरा मर्म जाणायचा असेल, त्यांनी या हेतुने गुजराती भाषा शिकावी अशी आमची नम्र विनंती आहे.

अनुवादातील त्रूटींसाठी आपली क्षमा प्रार्थितो.

## वाचकांना...

❖ ह्या पुस्तकातील मुद्रित पाठ्यसामग्री मूळत: 'चमत्कार' या गुजराती पुस्तकाचे मराठी अनुवाद आहे.

❖ जिथे जिथे 'चंदुभाऊ' या नावाचा उल्लेख केला आहे, तिथे वाचकांनी स्वत:चे नाव समजून वाचन करावे.

❖ पुस्तकातील कोणतीही गोष्ट जर तुम्हाला समजली नाही, तर प्रत्यक्ष सत्संगात येऊन त्याचे समाधान मिळवावे अशी नम्र विनंती.

❖ दादाश्रींच्या श्रीमुखातून निघालेले काही गुजराती शब्द जसेच्या तसे *'इटालिक्स'* मध्ये ठेवले आहेत, कारण त्या शब्दांसाठी मराठीमध्ये तसेच कोणतेही शब्द उपलब्ध नाहीत की ज्यामुळे त्याचा अर्थ पूर्णपणे समजता येईल. पण तरीही त्या शब्दाचे समानार्थी शब्द ( ) कंसात लिहिलेले आहेत.

## संपादकीय

लोकांच्या मान्यतांचा प्रवाह उलट्या दिशेत ओढून नेणारे प्रबळ परिबळ या काळात ठिकठिकाणी पसरतच राहिले आहे, आणि ते आहे चमत्काराविषयी तऱ्हेतऱ्हेच्या अंधश्रद्धांना जन्म देणाऱ्या जाहिराती! ज्या देशाची प्रजा चमत्कारांना मानते, त्यातच रमलेली असते आणि त्याची पूजा करत असेल, अशा देशाच्या आध्यात्माचे पतन कुठे जाऊन थांबेल त्याची कल्पना सुद्धा आपण करू शकत नाही. चमत्कार कशास म्हणावा? बुद्धिने समजू शकणार नाही अशी बाहेरची क्रिया होणे म्हणजे चमत्कार? पण त्यात बुद्धिच्या समजुतीची सापेक्षता माणसा-माणसात वेगवेगळी असते. एकाच्या बुद्धित सामावली जात नाही, तर दुसऱ्याच्या बुद्धित सामावली जाते. बुद्धिची सीमा सुद्धा प्रत्येकाची वेगळी-वेगळीच आहे ना!

या काळात चमत्काराच्या भ्रांत मान्यतांना मूळासकट उपटून टाकणारे परम कृपाळु 'दादाश्री' नेहमी सांगत असत की, चमत्काराची यथार्थ डेफिनेशन (व्याख्या) तर समजली पाहिजे ना? पण चमत्कार कशास म्हणता येईल ही 'डेफिनेशन' या जगात तयार झालेली नाही. म्हणून याची डेफिनेशन नाही असे नाही. याची डेफिनेशन देण्यासाठी मी तयार आहे. चमत्कार त्यास म्हणतात की ज्यास दुसरा कोणी करूच शकत नाही. आणि सिद्धी त्यास म्हणतात की, त्यांच्या मागून येणारा दुसरा कोणी करू शकतो.

अत्याधुनिक काळात जिथे बुद्धी वैज्ञानिक क्षेत्रात नव-नवीन आश्चर्यांची परंपरा सर्जन करण्यात विकसित झालेली आहे, अशा वेळी भारतातील लोकं बुद्धिचे दरवाजे बंद करून भ्रांत श्रद्धेतच बुडून राहतील, ते परवडणार नाही. कित्येक विज्ञानाच्या सिद्धी असतात, त्या जोपर्यंत जाहीर झालेल्या नाहीत तोपर्यंत चमत्कारात मानल्या जातात. पण पब्लिकमध्ये प्रकट झाल्यानंतर त्यास चमत्कार म्हटले जात नाही. आजपासून शंभर वर्षांपूर्वी चंद्रावर चमत्काराचा दावा करून पदार्पण करणाऱ्याला चमत्कारिक पुरुष किंवा साक्षात् परमात्मा म्हणून लोक त्यांचे कौतुक करीत! आणि आज?!

आजकाल धर्मात खूप चमत्कार पाहायला मिळतात, ज्या प्रमाणे देवीचा वारा येतो, कुंकू पडते, हवेतून अंगारा येतो, वस्तू येतात, वगैरे वगैरे. आपले लोक यापासून खूप प्रभावित सुद्धा होतात. थोड्या वेळेसाठी अंत:करण तिथे स्तंभित होऊन जाते आणि सारे दु:ख विस्मृत होऊन आशेचा एक नवीन किरण प्रकटतो की, 'हो... आता माझी सगळी दु:खं मिटतील. देवी-देवतांची कृपा झाली!' पण थोड्या वेळानंतर पाहिले तर सर्वकाही पूर्ववत, जसेच्या तसे! एकही चिंता कमी झालेली नसते, थोडी सुद्धा आंतरिक शांती लाभलेली नसते! फक्त रवंथ करण्या इतकीच ती गोष्ट! हो, लोकांना तेवढ्या वेळेसाठी धर्मात पकडून ठेवते, इतकाच फायदा स्वीकार्य आहे.

निरनिराळ्या प्रकारच्या कौटुंबिक, सामाजिक किंवा व्यक्तिगत उपाधिमध्ये चारही बाजूंनी घेरले गेलेले, तरी सुद्धा शांतीने जगण्यासाठी धडपडणाऱ्या लोकांसाठी गरज आहे, त्यांना दाहकतेपासून गारव्याकडे घेऊन जाण्याची, अंधकारातून प्रकाशाकडे घेऊन जाण्याची, नाही की थोड्याफार उजेडाचाही घोर अंधकार करण्याची!

आध्यात्माच्या खऱ्या मार्गावर जाणारे, नराचे नारायण पद प्राप्त करणाऱ्या वर्गातील मूळ पुरुषांनी कधीही कोणताही चमत्कार केला नाही, आणि कधीही चमत्काराला महत्त्व दिले नाही. त्यानंतरचे संत, भक्त सामान्य रितीने समजू शकू अशा गोष्टींना सुद्धा ऐक्झागरेट करून (आहे त्यापेक्षाजास्त करून) चमत्कारात खपवतात. भक्तिवेडे भक्त भगवंतांला काहीही म्हणतात. त्यांच्या बाबतीत तेही स्वीकार्य आहे. पण आज आपण सुशिक्षित समजदार लोकांनी इतका विचार तर केलाच पाहिजे की, या चमत्काराचा आश्रय घेऊन शेवटी आपण काय मिळविले? कृष्ण, राम किंवा महावीरांनी कोणतेही चमत्कार केले नव्हते आणि त्या बाजूस लोकांना भ्रमित पण केले नव्हते. स्वत:चे जीवन ते आदर्शपणे जगून गेले. जे आज लोकांना कथानुयोगाच्या रुपात उपयोगी होत आहे आणि दुसरीकडे त्यांनी आध्यात्माची अचीवमेन्ट (प्राप्ती) केली की जी लोकांना ज्ञान प्राप्तीचा मार्ग दाखविते. थोडक्यात, आत्म्याला जाणून मोक्षातच जाण्याची ज्ञानवाणी प्रतिबोध करते.

चमत्कार कोण शोधतो? शोधण्याची गरज कोणाला? ज्याला या संसारातील भौतिक सुखांची कामना आहे, मग ती स्थूल स्वरुपाची किंवा सूक्ष्म स्वरुपाची असू शकते. आणि ज्याला भौतिक सुखापलीकडील असे आत्मसुख प्राप्त करण्याचीच एकमेव कामना आहे, त्याला आत्मसुखापलीकडील चमत्काराची काय गरज? अध्यात्म जगात सुद्धा जिथे अंतिम लक्षापर्यंत पोहोचायचे आहे आणि ते म्हणजे 'मी कोण आहे' याची ओळख करून घेण्याची, आत्म तत्त्वाची ओळख करून निरंतर आत्मसुखात मग्न रहायचे आहे, तिथे या अनात्म विभागाच्या लुभावणाऱ्या चमत्कारांत अडकून राहण्यास कुठे स्थान आहे?

मूळ पुरुषांची मूळ गोष्ट तर बाजूलाच राहिली पण त्यांच्या कथा ऐकत राहिले, गात राहिले आणि त्यातून जीवनात काही अंगिकारले नाही आणि ज्ञानाच्या भागाला तर जमिनीतच दाबून टाकले! या मूळ पुरुषांच्या मूळ गोष्टीला प्रकाशात आणून चमत्कार संबंधीच्या अज्ञान मान्यतांना 'दादाश्रींनी' झटकून टाकल्या आहेत. चमत्कारासंबंधी खरी समज दादाश्रींनी खूप कडक वाणीत प्रस्तुत केली आहे. वाचक वर्गाने त्या मागील आशय समजून घ्यावा अशी विनंती.

**- डॉ. नीरूबहन अमीन**

# चमत्कार

## चमत्कार कशास म्हणावे?

**प्रश्नकर्ता :** आध्यात्मिक साधना करत असताना चमत्कारासारखी शक्ति येते, ही गोष्ट खरी आहे की खोटी?

**दादाश्री :** नाही. असे आहे, आधी या चमत्काराची डेफिनेशन (व्याख्या) समजून घ्या. हे जे नाणे आहे, ते 'सोन्याचे नाणे' आहे, तर त्याची डेफिनेशन पाहिजे की नाही? की डेफिनेशन नसेल तर चालेल? असेच एखादे तांब्याचे नाणे असेल आणि त्यावर सोन्याचे 'गीलेट' करून आणले तर तेही डेफिनेशन नाही का मागणार? नाणे तेवढेच आहे, सोन्या सारखेच दिसते, म्हणून काय सोनंच आहे असे सांगितले तर चालेल का? आता हे जे डेफिनेशनवाले सोन्याचे नाणे आहे, त्यासमोर जर गीलेटवाले नाणे वजनात ठेवले तर ते वजनात कमी भरते. कशामुळे कमी भरते? कारण सोने वजनात जास्त असते. म्हणून आपण सांगतो की हे दुसरे नाणे डेफिनेशनपूर्वकचे नाही. अशाच प्रकारे चमत्कार सुद्धा डेफिनेशनपूर्वक असले पाहिजे. पण चमत्कार कशास म्हणावे, ही डेफिनेशन या जगात तयार झाली नाही. म्हणून याची डेफिनेशन नाही असे तर म्हणू शकत नाही ना. प्रत्येक वस्तुची डेफिनेशन असते की नाही? तुम्हाला काय वाटते?

**प्रश्नकर्ता :** बरोबर आहे.

**दादाश्री :** तर चमत्काराची डेफिनेशन तुम्ही सांगा. तुम्हाला डेफिनेशन काय वाटते? काय डेफिनेशन असायला हवी?

**प्रश्नकर्ता :** काहीही नवीन झाले आणि ती बुद्धिच्या बाहेरची गोष्ट असेल, तोच चमत्कार.

**दादाश्री :** तो चमत्कार नाही. कारण तुमची बुद्धी मर्यादित असेल तेथे लोक काय करतील? लोक कसे 'एक्सेप्ट' (स्वीकार) करतील? तुम्ही त्यास चमत्कार म्हणाल, पण जास्त बुद्धिवंत असेल, तो कसा स्वीकार करेल?

म्हणजे चमत्काराची व्याख्या जर तुम्ही समजाल, तर चमत्काराची व्याख्या जगात कोणीही दिलेली नाही. पण मी देण्यास तयार आहे. चमत्कार त्यास म्हणतात की दुसरा कोणी ते करूच शकत नाही, तो आहे चमत्कार!

## होत नाही नक्कल चमत्काराची

**प्रश्नकर्ता :** हो. पण त्यालाच वेगवेगळे नाव दिले, की यास सिद्धी म्हणतात, हे अमके म्हणतात, त्यालाच माणसं चमत्कार म्हणतात ना?

**दादाश्री :** सिद्धी त्यास म्हणतात की जो दुसरा, म्हणजे त्याच्या मागचा करू शकेल. पण चमत्कार तर त्यास म्हणतात की जे दुसरा कोणीही करू शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** आपण चमत्काराची जी डेफिनेशन दिली, अशी डेफिनेशन तर जगात कुठेच मिळणार नाही!

**दादाश्री :** अशी असणारच नाही ना! अशी डेफिनेशन नसल्यामुळे तर लोक चमत्काराचे गुलाम झालेत! चमत्काराचे शेठ बनायचे तेथे चमत्काराचे गुलाम झालेत!

म्हणजे दुसरा कोणी करू शकतच नाही, त्यास चमत्कार म्हटले जाते. कारण सिद्धी नेहमी उत्पन्न होतच राहते मग तो जेव्हा सिद्धीचा वापर करतो तेव्हा कमी सिद्धी असलेला त्यास चमत्कार म्हणतो. आणि जास्त सिद्धी असणाऱ्यांना त्याची दया येत असते की हा तर सिद्धीचा दुरुपयोग करीत आहे! तुम्हाला समजते का माझे म्हणजे?

**प्रश्नकर्ता :** हो, हो.

**दादाश्री :** सिद्धी वापरली म्हणजे काय, तर तुम्ही साधना करत-करत जी काही शक्ति प्राप्त करता, ती शक्ति तुम्ही दुसऱ्यांसाठी वापरता,

तेव्हा दुसऱ्यांना त्याचे खूप आश्चर्य वाटते, त्यास सिद्धी वापरली म्हणतात. पण आता यास चमत्कार म्हणू शकतो का? नाही, कारण जर कोणी दुसऱ्यानेही स्वत:ची सिद्धी वापरली तरी असाच चमत्कार होऊ शकतो, तात्पर्य दुसरा कोणी करू शकतो त्यास चमत्कार म्हटले जात नाही!

## शुद्धी तिथे सिद्धी

आता सिद्धी म्हणजे, असे आहे ना, की 'ज्ञान' नसले तरीही अनंत, अपार शक्ति आहे. अज्ञानदशेत सुद्धा अहंकार तर आहेच ना! पण तो अहंकार शुद्ध करतो, स्वत: स्वत:साठी काहीच वापरत नाही, स्वत:च्या वाट्यास जे आले असेल ते सुद्धा दुसऱ्याला देतो आणि स्वत: काटकसरीने राहतो, त्यामुळे त्याला खूप सिद्धी उत्पन्न होतात. म्हणजे संयमाच्या प्रमाणात सिद्धी उत्पन्न होत असतात. पण तरी आत्मज्ञानाशिवाय खरी सिद्धी तर नसतेच. ह्या लोकांना तर हृदयशुद्धीचीच सिद्धी असते. आता 'ज्ञान' नसेल पण फक्त हृदयशुद्धीच असेल, हिंदुस्तानाच्या लोकांना 'ज्ञान' (आत्मज्ञान) तर नाहीच. पण हृदयशुद्धी असते ना, त्यामुळे तो चोख (निर्मळ मनाचा) असतो, एक पैसा पण चुकीच्या मार्गाने घेत नाही, पैसे वाया घालवत नाही, जिथे पैशांचा अजिबात दुरुपयोग होत नाही, लोकांचे पैसे लुबाडत नाही, स्वत:च्या अहंकाराचा रुबाब दाखवत नाही, तसेच मी त्याला असे करून दिले व त्याचे तसे करून दिले अशी बढाई मारत नाही, तर अशा लोकांना हृदयशुद्धिची सिद्धी असते, ती खूप चांगली म्हटली जाते, पण तिथे 'ज्ञान' नसते.

## सिद्धीची 'सिमिली'

सिद्धीचा अर्थ तुम्हाला समजावतो, ते तुम्ही तुमच्या भाषेत समजू शकाल म्हणून. तुम्ही कोणत्या बाजारात व्यापार करता?

**प्रश्नकर्ता :** लोखंड बाजारात.

**दादाश्री :** आता त्या लोखंड बाजारात तो मनुष्य इतका आबरुदार मानला जातो की, 'भाऊ, नूर महंमद शेठची तर गोष्टच निराळी, मानावे लागेल त्या शेठला!' प्रत्येक व्यापारी असेच सांगेल आणि पाच लाख रुपये

तुम्ही तिथे ठेवले असतील ना, मग तुम्ही म्हटले की साहेब महिन्याच्या मुदतीने मी ठेवले आहेत, तर मला परत मिळतील का? तेव्हा तो म्हणेल, 'महिना पूर्ण झाल्यावर घेऊन जा.' म्हणजे महिना पूर्ण होताच सगळे पैसे परत करतो. पण मग दुसरे लोकही पैसे ठेवतात का त्याच्याकडे? का? लोकांना हे माहित आहे की सध्या लोक पैसे दाबून ठेवतात पण तरी या शेठकडे पैसे ठेवतात, त्याचे काय कारण? तर त्याने सिद्धी प्राप्त केलेली आहे. आता स्वत:जवळ सिद्धी असताना सुद्धा पैसे दाबून ठेवत नाही, सिद्धी वापरत नाही, या सिद्धीचा दुरुपयोग करत नाही आणि एकदाही जरी दुरुपयोग केला तर? तर ती सिद्धी वापरली गेली. मग त्याला कोणी पैसे उधार देत नाही, बाप सुद्धा देत नाही. म्हणजे ह्या दुसऱ्या सर्व सिद्धी सुद्धा याच प्रकारच्या आहेत. या उदाहरणावरुन मी तुम्हाला 'सिमिली' (उपमा) दिली.

आता तो शेठ बाजारातून दहा लाख रुपये गोळा करतो आणि घेऊन येतो. मग जेव्हा मुदत संपते तेव्हा सर्वांना पैसे परत करतो, आणि वेळेवर देतो म्हणून कधी पंचवीस लाख रुपये पाहिजे असतील तर त्याच्याकडे सिद्धी असेल की नाही?

**प्रश्नकर्ता :** पण यास सिद्धी म्हणता येणार नाही. ही तर नॉर्मल पॉवरची गोष्ट झाली, व्यवहाराची गोष्ट झाली आणि सिद्धी तर एब्नॉर्मल पॉवरची गोष्ट आहे.

**दादाश्री :** हो, पण ती सिद्धी सुद्धा यासारखीच आहे. माणसाने काही पॉवर वापरली नसेल ना, तर हे उपयोगात येते. पण जर पॉवर वापरली तर सिद्धी नष्ट होऊन जाते! म्हणजे तो मनुष्य सहजपणे हिंडता-फिरता पंचवीस लाख रुपये जमा करू शकतो, तेव्हा आपल्याला हे नाही का समजणार की ओहोहो, किती सिद्धी आहे त्याच्याजवळ! किती सिद्धी प्राप्त केली आहे!

## प्राप्त होतात अशा प्रकारे सिद्धी

आणि एक माणूस स्वत:ची काही ठेव(पैसे)दुसऱ्यांकडे ठेवण्यासाठी फिरत असेल तरीही लोक म्हणतील, 'नाही, भाऊ, सध्या आम्ही कुणाचे

काही घेतच नाही. तेव्हा हा किती भांडखोर असेल की कोणी त्याची ठेव ठेवण्यासाठी तयार नाही?! त्याचे कारण काय आहे, ते मी तुम्हाला समजावतो. तुम्ही असे म्हणाल की मी कधी कुणाचे पैसे दडपून ठेवले नाही, तरी सुद्धा लोक माझ्याकडे पैसे का ठेवत नाहीत? आणि कित्येक लोकांकडे तर लाखो रुपये जमा ठेवून जातात! हे मी तुम्हाला उदाहरण देत आहे. तुमच्या आतील जे भाव, तुमची श्रद्धा, तुमचे वर्तन अशा प्रकारचे आहे की, तुमच्याकडे कोणी काही ठेव वगैरे ठेवणार नाही. आणि ज्याच्या मनात निरंतर अशी परत देऊन टाकण्याची इच्छा असते, कोणाचे घेण्या अगोदरच परत करण्याची इच्छा असते, निश्चितच असते, आणि वर्तनात सुद्धा असेच असते आणि श्रद्धेत देखील असेच असते, निश्चयातही असेच असते, अशा व्यक्तिकडे लोक आपली ठेव ठेवत असतात! कारण त्याने सिद्धी प्राप्त केली आहे. कोणती सिद्धी प्राप्त केली आहे? तर सगळ्यांचे पैसे ठरवल्याप्रमाणे परत करून देतो. मागितले की लगेच परत करतो. आणि जो मागितल्यावर सुद्धा परत करत नाही, तर त्याची सिद्धी नष्ट होते. जशी ही पैशांसाठीची सिद्धी आहे, त्याप्रमाणे ह्या दुसऱ्या सर्व निरनिराळ्या प्रकारच्या सिद्धी उत्पन्न होतात.

सिद्धी म्हणजे स्वत:चे व्यवहार अगदी 'रेग्युलर' ठेवणे आणि अधिक सिद्धी कोणती? तर लोकांनी त्याला जे काही जेवायला दिले असेल त्यातूनही स्वत: कमी खाऊन दुसऱ्यास खाऊ घालत असेल, त्याला अधिक सिद्धी उत्पन्न होतात. आपल्या इथे असे संत होऊन गेले. आता एखादा माणूस कोणालाही शिव्या घालत नसेल, कोणाला दटावत नसेल, कोणाला दु:ख देत नसेल, त्याचे शील इतके सारे असते की त्याला पाहताक्षणीच सर्व आनंदाने नाचू लागतात. त्यासही सिद्धी उत्पन्न झाली असे म्हणतात.

नंतर एखाद्या माणसाने असे ठरवले असेल की मला अमुक प्रकारचे भोजन खायचे नाही. ते खाण्याचे बंद केले असेल, त्यावेळी त्याला सिद्धी उत्पन्न होते. तसेच एखादा माणूस कांदा खात नसेल तर त्याला दूर रस्त्यावर जरी कांदा पडलेला असेल तरी त्याचा वास येतो आणि तुम्हाला तर कांदा जवळच पडलेला असेल तरीही वास येणार नाही. तुम्ही स्वत: कांदा खाल्ला असेल तरीही वास येत नाही. असेच सिद्धीसाठीही असते!

## ही सिद्धी नव्हे

**प्रश्नकर्ता :** पण पुष्कळशा योगींना चमत्कार येत असतात, साधारणपणे लोक पाहू शकत नाहीत, समजू शकत नाहीत, अशा गोष्टी ते लोक करू शकतात. त्यांच्याकडे सिद्धी असते, काही विशेष शक्ति असते, ते काय आहे ?

**दादाश्री :** कुठल्या लोकांमध्ये तुम्ही विशेष शक्ति पाहिली ? आता तर चमत्कारासाठी कोणीतरी बक्षिस ठेवले आहे ना, तिथे तर एकही मनुष्य जात नाही. म्हणजे विशेष शक्ति एकालाही नसते. कुठून आणतील ? असे चमत्कार होतात का ? हे तर फक्त यशनाम कर्म असते की भाऊ, यांच्या नावाने बोलले, म्हणजे तसे घडते. किंवा मग कोणी हृदयाने निर्मळ असेल, तर त्यांच्या बोलण्याप्रमाणे सर्व घडते. अशा हृदयशुद्धीच्या सिद्धी असतात.

**प्रश्नकर्ता :** पण योगविद्येने अशा काही शक्ति प्राप्त होत असतात ना ? काही चमत्कार होऊ शकतील अशा सिद्धी प्राप्त करतात ना ?

**दादाश्री :** सिद्धी वगैरे काही प्राप्त होत नाही. चमत्कार होऊ शकतील अशा सिद्धी नसतातच.

**प्रश्नकर्ता :** हे योगी लोक एखाद्याच्या डोक्यावर हात ठेवून शक्तिपात करतात आणि त्यामुळे त्या व्यक्तिला शांती मिळते, यास सुद्धा सिद्धी म्हणतात ना ?

**दादाश्री :** असे आहे ना, आता बसले जात नसेल, बोलले जात नसेल, पण जर ती औषधीवनस्पति उगाळून पाजली तर काय होईल ? चालता-बोलता होईल, तसेच ह्या मानसिक परमाणुंचे असते. पण त्यात काय फायदा ? असा कोणी मनुष्य जन्माला आला की ज्याने एखाद्या माणसाला मरूच दिले नाही ?! तेव्हा आपण असे समजू की चला आपल्याला तिथे जावेच लागेल. स्वत:च्या आई-बापाला मरू दिले नसेल, त्याच्या भावाला मरू दिले नसेल, असा कोणी जन्माला आला का ? तर मग यात कसल्या सिद्धी ?

या चोरांना तर अशा–अशा सिद्धी असतात की त्यांनी जर ठरवले की आज मला अमक्या ठिकाणी, अमक्या वेळी चोरी करायची आहे, तर त्या टाईमाला 'एक्झेक्ट' तसे होत असते, तर ही काय कमी सिद्धी म्हटली जाईल? त्यात ते सर्व नियम पाळतात. आणि नियम पाळल्याने सिद्धी उत्पन्न होते.

आपले लोक सिद्धी कशास म्हणतात, ते मी तुम्हाला सांगतो. कोणी शीलवान पुरुष असेल तो अंधारात या बोळात शिरत असेल, संपूर्ण बोळ सापानेच भरलेला असेल, साप तिथे फिरतच असतील आणि तो शीलवान अनवाणी पायांनी बोळात शिरला. अंधार असल्यामुळे त्याला हे कळत नाही की तिथे साप होते की नाही. त्याचे काय कारण असेल ते सांगा? त्याची सिद्धी असेल? आख्या बोळात एका बोटा ऐवढी जागा सुद्धा सापाशिवायची नव्हती. ज्यावेळी तो बोळात गेला तेव्हा तिथे साप होते, पण ते त्याच्या वाटेत येत नाहीत. कारण चुकून जरी साप त्याला शिवला तर साप भाजेल. म्हणून साप एकमेकांवर चढून जातात. अंधारात सुद्धा पुढच्या पुढेच एकमेकांवर चढतात. असा तर त्याचा प्रताप असतो! आता असे जर कधी लोकांनी पाहिले ना, तर ते काय म्हणतील? की ओहोहो! कशी सिद्धी आहे! पण हे तर त्याचे शील आहे. अज्ञानी असेल तरीही शील उत्पन्न होते, परंतु अज्ञानीला संपूर्ण शील उत्पन्न होत नाही, कारण अहंकार आहे ना?

## संतांची सिद्धी, संसारार्थ

**प्रश्नकर्ता :** काही संत तर पाऊस पाडत होते. तर ती सिद्धी आहे की नाही?

**दादाश्री :** हा पाऊस पडण्यासाठी आपले सरकार काहीतरी 'केमिकल' फवारतात ना, त्यामुळे सुद्धा पाऊस पडतो की नाही? पडतो! आणि खरे सिद्धीवाले तर असे पाऊस वगैरे पाडत नाहीत. अशी सिद्धी अज्ञानीला उत्पन्न होते, पण लालचीपणामुळे तो वापरुन टाकतो. ह्या इथे, बडोद्यात पाऊस पडत नव्हता. येथे एक महाराज आले होते. ते म्हणत होते 'मी पाऊस पाडेन.' म्हणजे ही तर एक घडलेली घटना सांगत आहे.

घडलेली म्हणजे मी स्वत: बघितलेली नाही पण मी ज्याच्याकडून ऐकली, त्याने सुद्धा दुसऱ्यांकडून ऐकलेली होती, म्हणजे ती प्रत्यक्ष दोन-तीन पिढ्यांपासून पाहत आलेली गोष्ट आहे.

एके वर्षी बडोद्यात दुष्काळ पडला होता. तर तेथील राजाला एका व्यक्तिने जाऊन सांगितले की, 'एक महाराज आले आहेत आणि ते पाऊस पाडू शकतील असे आहेत.' तेव्हा राजा म्हणाले, 'असे होऊच शकत नाही, मनुष्य कसा पाऊस पाडू शकेल?' तेव्हा तो म्हणाला, 'नाही, ते महाराज असे आहेत की ते पाऊस पाडू शकतात!' म्हणून मग राज्यातील मोठ-मोठे शेठ होते ते एकत्र जमले, गावातील सगळे पाटीलही एकत्र जमले आणि सर्वांनी नगरशेठांजवळ ही हकीकत सांगितली. तेव्हा ते सर्व नगरशेठ राजाला म्हणाले की, 'हो, साहेब, त्या महाराजांना बोलवा. नाहीतर दुष्काळाने ही पब्लिक मरुन जाईल.' तेव्हा राजा म्हणाला, 'हो, तर येऊ द्या, त्या महाराजांना!' म्हणून ते सर्व महाराजांकडे पोहचले. तेव्हा मग ते महाराज काय म्हणाले? 'ऐसे बारीश नही हो जाएगी. हमे गद्दीपर बिठाओ.' तर तो राजा उठून दुसऱ्या ठिकाणी बसला आणि त्या महाराजांना गादीवर बसवले. लालूच आहे ना! राजालाही लालूच उत्पन्न होते तेव्हा काय? सर्वकाही सोपवतो! आता हे महाराज एका बाजूने गादीवर लघवी करतात आणि दुसऱ्या बाजूला बाहेर जोरदार पाऊस पडतो. तात्पर्य, उत्पन्न झालेल्या सिद्धी हे लोक अशा प्रकारे वापरुन टाकतात! म्हणजे ह्या सर्व अज्ञानी लोकांची सिद्धी अशा प्रकारे वापरली जाणार. ते बिचारे सिद्धी कमवतात सुद्धा आणि त्यांच्याकडून ती वापरली पण जाते. 'ज्ञानी' सिद्धींना वापरत नाहीत. भगवंत सुद्धा कधी सिद्धी वापरत नाहीत. नाहीतर महावीर भगवानांनी फक्त एकच सिद्धी वापरली असती ना, तरी जगात उलथापालथ झाली असती.

## तीर्थंकरांच्या सिद्धी, मोक्षार्थ

भगवान महावीरांच्या दोन शिष्यांना गोशालाने तेजोलेश्या सोडून भस्मीभूत करून टाकले होते. तेव्हा दुसऱ्या शिष्यांनी भगवंतांना सांगितले, विनंती केली की, 'भगवंत आपण तीर्थंकर भगवंत असून, जर आमचे रक्षण

करू शकत नाही मग जगात रक्षण कोण करणार?' तेव्हा काय भगवान महावीर रक्षण करू शकतील असे नव्हते? या सर्व सिद्धीवाल्यांपेक्षा ते काय कमी होते? कसे भगवंत, तीर्थंकर भगवंत! त्यांनी काय उत्तर दिले माहित आहे का तुम्हाला? भगवंत म्हणाले, 'मी जीवनदाता नाही, मी तर मोक्षदाता आहे!' 'कोणी मरेल, त्यास जीवनदान देणारा नाही, मी तर मोक्षाचे दान देण्यास आलो आहे!' आता त्या लोकांना तर असेच वाटेल ना की, या गुरुंपेक्षा तर कोणी दुसरे गुरु केले असते तर चांगले झाले असते. पण माझ्या सारख्याला तर किती आनंद होणार! धन्यभाग्य गुरु हे! म्हणावे लागेल! यांचाच शिष्य होण्याची गरज आहे. तर यांचाच मी शिष्य झालो होतो. त्याच महावीरांचा शिष्य झालो होतो. कसे भगवान महावीर! गोशालाने त्यांची फसवणूक केली, खूप लोकांनी फसवले, त्रास दिला पण भगवंतांची स्थिरता ढळली नाही, ते कधी विचलीत झाले नाहीत. त्यांनी कधी सिद्धी वापरली नाही!

नंतर गोशालाने भगवंतांवर काय केले होते हे माहित आहे का तुम्हाला? तेजोलेश्या सोडली होती. त्या दोन शिष्यांवर सुद्धा त्याने तेजोलेश्याच सोडली होती, ते दोघे खलास झाले, तसेच भगवंत सुद्धा खलास झाले असते. पण भगवंत तर चरम शरीरी असल्यामुळे त्यांच्यावर कुठल्याही प्रकारचा घात होऊ शकत नाही. चरम शरीर तर कापल्यानेही कापले जात नाही, म्हणजे पुद्‌गल सुद्धा असे सुंदर! पण मग सहा महिन्यांपर्यंत संडासातून खूप रक्त गेले. तरी सुद्धा त्या पुरुषाने (भगवंताने) थोडी सुद्धा सिद्धी वापरली नाही!

## सिद्धी वापरत नाहीत, ते ज्ञानी

आणि ज्ञानीपुरुष सुद्धा सिद्धी वापरत नाहीत. आमच्या हाताने सहज जरी स्पर्श झाला तरी समोरच्याचे कल्याण होऊन जाते. बाकी, 'ज्ञानीपुरुष' त्यांच्या घरीही सिद्धी वापरत नाहीत आणि बाहेरही वापरत नाहीत, स्वत:च्या शरीरासाठी सुद्धा वापरत नाहीत! कशासाठी डॉक्टरकडे जातात? हे डॉक्टर तर विचारतात की, 'तुम्हा ज्ञानीपुरुषांना कशासाठी यावे लागते?' तेव्हा मी सांगितले, 'मी पेशन्ट आहे, म्हणून यावे लागते.' म्हणजे देहासाठी सुद्धा कोणत्याही सिद्धीचा उपयोग करायचा नाही.

अज्ञानी तर जिथे-तिथे सिद्धी वापरुन टाकतो. त्याच्याजवळ जेवढी सिद्धी जमा झाली असेल, तर लोकांनी त्याला बापजी-बापजी म्हटले की तिथे वापरली जाते. जेव्हा ज्ञानींजवळ तर त्यांची जेवढी सिद्धी जमा झालेली असेल, त्यापैकी एक आणा सुद्धा सिद्धी खर्च होत नाही.

'ज्ञानीपुरुष' तर अद्‌भूत म्हटले जातात. जग तर अजून त्यांना समजू शकलेच नाही. त्यांच्या सिद्धी तर, फक्त हात लावला आणि काम होऊन जाते. या इथे माणसांमध्ये जे सर्व परिवर्तन झाले आहे ना, तसे परिवर्तन कोणाकडूनही एका माणसात देखील झालेले नाही. हे तर तुम्ही पाहिलेत ना? काय परिवर्तन झाले आहे ते? बाकी, असे तर कधी घडलेच नाही, प्रकृती कधी बदलतच नाही माणसाची! पण तसे सुद्धा झाले आहे आपल्या इथे! आता हे तर मोठ-मोठे चमत्कार म्हटले जातील, आश्चर्यकारक चमत्कार म्हटले जातात. एवढ्या वयात हे भाऊ सांगतात की, 'माझे घर तर स्वर्गासारखे झाले आहे, स्वर्गात सुद्धा असे नसेल!'

**प्रश्नकर्ता :** तीच शक्ति आहे ना!

**दादाश्री :** 'ज्ञानीपुरुषांमध्ये' तर गजबची शक्ति असते, फक्त असे हात लावले की काम होऊन जाते! पण आम्ही सिद्धी वापरत नाही. आम्हाला तर कधीही सिद्धीचा उपयोग करायचा नसतो. ही तर सहजपणे उत्पन्न झालेली असते, आम्ही वापरली तर सिद्धी संपून जाईल!

ह्या दुसऱ्या लोकांची तर सिद्धी खर्च होऊन जाते, कमवलेली असते ती खर्च होते. तुमची तर खर्च होत नाही ना?

**प्रश्नकर्ता :** नाही, खर्च करणार नाही. पण अशी सिद्धी उत्पन्न होईल तर चांगले.

**दादाश्री :** अरे, सहज जर चढवले ना तुम्हाला, तर लगेच सिद्धी वापरुन टाकाल तुम्ही! आणि आम्हाला चढवा बघू, आम्ही एकही सिद्धी वापरणार नाही!

ज्यांच्या जवळ एवढ्या साऱ्या सिद्धी असताना सुद्धा, त्यांनी एकच फुंकर मारली असती तर संपूर्ण जग उलथे-पालथे झाले असते, एवढी

शक्ति असणारे महावीर, तर असे महावीर भगवंत काय म्हणाले? 'मी जीवनदाता नाही, मी मोक्षदाता आहे!' आता तिथे जर महावीरांनी ही सिद्धी वापरली असती, तर त्यांचे तीर्थंकरपद गेले असते! ह्या शिष्यांच्या सांगितल्याने जर भगवंत चढले असते तर तीर्थंकरपद निघून गेले असते. पण भगवंत चढले नाहीत. कदाचित माझ्यासारखा चढला असता! खरे तर मी सुद्धा चढीन असा नाही. मी चढूनच तर मार खाल्ला आहे, त्यामुळेच आता सावध झालो आहे. म्हणजे एकदा जर मार लागला असेल तर पुन्हा मार लागू देईल का?

म्हणजे भगवंत चमत्कार करीत नाहीत आणि सिद्धी देखील वापरत नाहीत.

## सिद्धी वापरल्यास, किंमत कवडीची

सिद्धी म्हणजे काय हे समजले का तुम्हाला?

आता मला करोड, दोन करोड रुपये जमा करायचे असतील तर जमा होऊ शकतील? मी बोलल्याबरोबरच जमा होतील. लोक तर संपूर्ण संपत्ती देण्यास तयार आहेत, त्याचे काय कारण? सिद्धी आहे माझ्याकडे. त्याचा जर मी उपयोग केला तर मग माझ्याकडे काय उरेल? कितीतरी प्रयोग केल्यानंतर ही सिद्धी प्राप्त होते आणि मला पैशांची गरज नाही. पण माझ्या ज्या दुसऱ्या सिद्धी आहेत, आंतरिक सिद्धी आहेत, त्या तर जबरदस्त सिद्धी आहेत. पण भगवान महावीरांनी सिद्धी वापरल्या नाहीत, भगवान कमी पडले नाहीत. तर मी सुद्धा त्यांचाच शिष्य आहे, खूप पक्का शिष्य आहे. मी गोशाला सारखा नाही. खूप पक्का शिष्य, असली शिष्य! एवढा पक्का की, संपूर्ण जग जरी माझे विरोधी झाले तरीही मी घाबरणार नाही एवढा पक्का आहे. मग याहून जास्त आणखी काय पुरावा पाहिजे? सिद्धीचा दुरुपयोग करत नाही म्हणूनच ना? आणि जर सिद्धीचा दुरुपयोग केला तर? लगेचच चार आण्याचे होतील 'दादा'! मग लोक म्हणतील, 'जाऊ द्याना, दादांनी तर आतल्या आत घेणे सुरु केले आहे!' पण मी गॅरन्टी सहित सांगतो की सीक्रेसी सारखी (गोपनीय) वस्तुच नाही. चोवीसही तास, वाटेल तेव्हा तुला पाहायचे असेल तेव्हा तू ये, सीक्रेसीच नाही इथे! आणि जिथे सीक्रेसी

नसते, तिथे काहीच नसते आणि जिथे 'काही असते' तिथे सीक्रेट असते. त्यांच्या खोलीत ठराविक वेळेपर्यंत जाऊ देत नाहीत. जेव्हा इथे तर वाटेल तेव्हा 'एट एनी टाइम' येऊ शकता, रात्री बारा वाजता, एक वाजता! काही सीक्रेसीच नाही, मग काय? सीक्रेसी नाही त्याचप्रमाणे काही डिप्रेशन सुद्धा पाहायला मिळणार नाही. कुठल्याही वेळी, एट एनी टाइम, कुठल्याही क्षणी दादाजी डिप्रेशनमध्ये असूच शकत नाहीत. एलिवेशनमध्ये तर राहतच नाही पण डिप्रेशन सुद्धा नसते! ते परमानंदातच असतात!

म्हणजे मला या सिद्धी वापरायच्या असतील तर वेळ लागेल का? का वेळ लागेल! जे मागेल ते मिळेल, पण मी भिकारी नाही. कारण 'ज्ञानीपुरुष' कोणास म्हणतात?! स्त्रियांची भीक नाही, लक्ष्मीची भीक नाही, सोन्याची भीक नाही, मानाची भीक नाही, कीर्तीची भीक नाही, कोणत्याही प्रकारची भीक नसते तेव्हा हे पद प्राप्त होते!

## येते संकट धर्मावर, तेव्हा...

शेवटी, 'ज्ञानीपुरुष' तर देहधारी परमात्माच म्हटले जातात. म्हणजे त्यांची गोष्ट तर वेगळीच आहे ना?! ते हवे तेवढे करू शकतील, पण ते तसे करत नाही ना, अशी जोखिम अंगिकारणारच नाही ना! हो, जर धर्मावर दडपण येत असेल, धर्मावर संकट येत असेल, धर्म अडचणीत येत असेल तेव्हा करतात, अन्यथा करीत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे लौकिक धर्मावर काही संकट येते तेव्हा 'ज्ञानीपुरुष' सिद्धी वापरतात?

**दादाश्री :** नाही, लौकिक धर्मावर नाही, फक्त धर्म, म्हणजे जी अलौकिक वस्तू आहे ना, तिथे संकट आले असेल तेव्हा सिद्धी वापरतात. बाकी, हे लौकिक धर्म तर लोकांचे मानलेले धर्म आहेत. त्याचा काही ठिकाणाच कुठे आहे? आपले महात्मा संकटात असतात, तेव्हा तर वापरावीच लागते ना! पण तेही आम्ही सिद्धी वापरत नाही, फक्त ओळख असल्यामुळे (देवी-देवतांना) कळवतो. विनाकारण सिद्धी खर्च केली जाऊ शकतच नाही ना!

**प्रश्नकर्ता :** सिद्धी उत्पन्न होते आणि ती वापरायची नाही, तर मग त्याचा अर्थच काय ?

**दादाश्री :** जो वापरतो त्याच्यावर जबाबदारी येते. ती सिद्धी तर आपोआपच वापरली जाते, आपण वापरायची नाही.

**प्रश्नकर्ता :** जर सिद्धीचा उपयोग होणार नसेल तर मग ती सिद्धीचा काय उपयोग ?

**दादाश्री :** असे आहे, सिद्धी म्हणजे सिद्ध होण्याचे अंश! ते अंश आपण सिद्ध होण्यापूर्वीच वापरुन टाकले तर सिद्ध होऊ शकतो का?! बाकी, मनुष्य जसजसा उंच पातळीवर जातो ना, तसतशी सिद्धी उत्पन्न होते. आता त्या सिद्धीचा जर दुरुपयोग झाला तर सिद्धी नष्ट होऊन जाते.

## नाही चमत्कार जगात कुठेही ?

म्हणजे हे तर सिद्धीचा उपयोग करतात, त्यास आपले लोक 'चमत्कार' म्हणतात. तर मग दुसरा कोणी सिद्धी वापरेल त्यालाही चमत्कार म्हटले जाईल. पण ते चमत्कार म्हटले जात नाहीत. चमत्कार म्हणजे, जे दुसरे कोणीही करू शकत नाही, त्याचे नाव चमत्कार. दुसरा करतो म्हणजे त्याचा अर्थ एवढाच की तुम्ही सुद्धा जेव्हा त्या 'डिग्री' वर पोहोचाल तेव्हा तुम्ही तुमची सिद्धी वापराल, तर त्यास देखील असाच चमत्कार मानला जाईल आणि जो सिद्धी वापरत नाही त्याच्याजवळ चमत्कार नाही का?!

माझ्या बरोबरीचा बसला असेल तर तो माझ्यासारखेच सर्वकाही करणार की नाही करणार? असे अवश्य होईल. म्हणून ते चमत्कार म्हटले जात नाहीत. ते तर बाय प्रॉडक्ट आहे सिद्धीचे! माझी इच्छा नाही की असे चमत्कार करू, पण तरी देखील एवढे 'बाय प्रॉडक्ट' आहे, म्हणजे यशनाम कर्म आहे त्यामुळे हे प्राप्त होते!

अर्थात् दुसरा कोणी करू शकत नाही, त्यास म्हणतात चमत्कार! ही डेफिनेशन तुम्हाला आवडली तर स्वीकारा, नाहीतर ही डेफिनेशन आमची स्वतंत्र आहे. कोणत्या पुस्तकात लिहिलेली सांगत नाही!

या चमत्काराचा अर्थ तुम्हाला समजला ना? कोणी म्हणेल, 'मी हा चमत्कार केला' तर तुम्ही काय म्हणाल? की 'हे तर दुसरा कोणी पण करू शकेल, तुमच्या डिग्रीपर्यंत पोहोचलेला मनुष्य करू शकतो, त्यात तुम्ही काय (नवीन) केले?! जी विद्या दुसऱ्याला शिकवल्याने तो करू शकत असेल तर त्याला चमत्कार म्हणू शकत नाही. चमत्कार तर दुसरा कोणीही मनुष्य करूच शकत नाही! तात्पर्य हेच की दुसरा कोणी करू शकत असेल त्यास चमत्कार म्हटले जात नाही. म्हणून कोणत्याही ठिकाणी चमत्कार मानू नका. कोणी चमत्कारी मनुष्य जगात झालेला नाही!

## लपलेली आहे तिथे काही भीक

चमत्कार करणारा तर अजून कोणी जन्मलेलाच नाही या जगात! चमत्कार तर कशास म्हटले जाते? जर हा सूर्यनारायणाला इथे असा हातात घेऊन येईल, तर त्यास आपण सर्वात मोठा चमत्कार म्हणू. तेव्हा हे असे इतर सर्व तर चमत्कार मानले जाणारच नाहीत! कदाचित एखादा मनुष्य सूर्यनारायण जरी हातात घेऊन आला, तरी तो चमत्कार म्हटला जाणार नाही. कारण त्याला काहीतरी भूक आहे, तो कशाचा तरी भुकेला आहे! आम्ही तर त्याला विचारु की, तू कशाचा भिकारी आहेस, की ज्यामुळे तू त्यांना (सूर्यनारायणाला) तिथून हलवलेस? ते जिथून प्रकाशमान करीत आहेत, तिथून त्यांना तू कशासाठी हलवित आहेस? त्यांना तिथून इथे आणण्याचे काय कारण? तू कशाचा तरी भिकारी आहेस, म्हणूनच तू त्यांना आणलेस ना? ज्याला काहीतरी इच्छा असेल तोच आणेल ना? कोणती तरी इच्छा असेल, विषयाची इच्छा असेल, मानाची इच्छा असेल, किंवा लक्ष्मीची इच्छा असेल. जर तू लक्ष्मीचा भिकारी आहेस, तर आम्ही तुला सर्व लक्ष्मी गोळा करून देऊ. पण तू आता सूर्यनारायणाला हलवू नकोस. तेव्हा जा आणि त्यांना परत ठेवून दे! काय गरज आहे याची? सूर्यनारायण तिथे आहेत, पण लोकांसमोर देखावा करण्यासाठी तू त्यांना इथे आणलेस? खरा पुरुष तर कोणत्याही वस्तुला हलवित नाही. उलट-सुलट करतात तेव्हा आपण त्याची दानत नाही का ओळखू शकत की त्याची दानत खराब आहे! आणि त्यापासून आपल्याला काय फायदा होतो? आपली एक वेळेचीही भूक मिटत नाही! आता देवलोकांना इथे बोलवून दर्शन घडविले,

तरी देखील आपल्याला त्याचा काय फायदा ? तेही व्यापारी आणि आपणही व्यापारी ! हो, मोक्षाला जाणारे असे 'ज्ञानीपुरुष' किंवा 'तीर्थंकर' असतील तर आपल्याला फायदा होतो. ज्यांचे दर्शन केल्यानेच आपले भाव प्रभावास प्राप्त करतात, भाव उच्च प्रकारचे झाले तर कामाचे !

म्हणजे जिथे हुशार माणसं असतात ना, ज्यांची 'फूलिशनेस'( मूर्खता) समाप्त झालेली आहे, ते लोकं चमत्काराला मानतच नाहीत. हे चमत्कार तर बुद्धु लोकांना बुद्धु बनविण्याचा मार्ग आहे, समंजस लोकांना नाही !!

म्हणून मी ह्या सगळ्या लोकांना सांगितले होते की, वरुन कोणी सूर्यनारायणाला आणून दाखवले तर सर्वात आधी त्याला विचारा की, 'तू कशाचा भिकारी आहेस, ते तू आम्हाला सांग एकदा!' आता एवढे मोठे तर कोणी करू शकेल असे नाही ना ? तेव्हा हे दुसरे तर चमत्कार म्हटले जाऊ शकतच नाहीत !

## चमत्कार की विज्ञान ?

**प्रश्नकर्ता :** तर ही जी चमत्कारासारखी गोष्ट सांगतात ती मेस्मेरिजम (सम्मोहन)आहे ? हे वास्तवात काय आहे ?

**दादाश्री :** चमत्कार म्हणजे मूर्ख बनविण्याचा धंदा ! आपल्याला समजत नाही ना, त्यास आपण चमत्कार म्हणतो ! पण ते काय असते ? तर ते विज्ञान आहे. जे विज्ञान आपण जाणत नाही, त्यास चमत्कार रुपात दाखवतात. आणि दुसरे, ते नजरबंदी करतात. बाकी, हे चमत्कारासारखे काहीच नसते, हे तुम्ही नक्की मानावे. जिथे किंचितमात्र चमत्कार आहे, त्यास जादुगिरी म्हटली जाते.

**प्रश्नकर्ता :** पण दादा, अमुक लोक तर चमत्कार करून दाखवतात सगळ्यांना आणि सगळ्यांना चमत्कार दिसतो सुद्धा ना !

**दादाश्री :** ते तर विज्ञान जाणत नसल्यामुळे चमत्कार वाटतो. आपल्या येथे सत्संगात एका महात्म्याला चमत्कार करता येतो. मी त्याला सांगितले, 'तू चमत्कार करतो, पण चमत्कार तर खोटी गोष्ट आहे,' तेव्हा तो म्हणाला, 'दादाजी, हे तर तुम्ही असे सांगू शकता. पण मला असे

म्हणता येणार नाही ना!' मी म्हणालो, 'तू चमत्कार करतोस, ते आहे तरी काय? मला ते दाखव तरी'! तो म्हणाला 'हो, दाखवतो.' नंतर त्याला प्रयोग करण्यास बसवले. त्याने दहा पैशांचे नाणे एका व्यक्तिच्या हातात दिले आणि त्याला मुठ बंद ठेवायला सांगितले. मग त्याने काय केले? एक आगकाडी पेटवून तिला दूर ठेवून असे-असे, दूरुनच हात फिरवून मंत्र बोलू लागला. थोड्यावेळाने ते मुठीतले नाणे गरम होऊ लागले. मग त्याने दुसरी आगकाडी पेटवली. तेवढ्यातच ते नाणे एवढे गरम झाले, की त्या व्यक्तिने मुठीतले नाणे सोडून दिले, हात भाजेल असे होते! मग मी त्याला म्हणालो, 'दुसरे चमत्कार करायचे असतील ते कर, पण तू मला या चमत्काराचा उलगडा करून दे.' तेव्हा तो म्हणाला, 'त्यात अशा प्रकारच्या वस्तू असतात, केमिकल्स, तर आम्ही ते केमिकल्स नाण्यावर जरासे असे घासून मग त्यांना देतो, त्यावेळी ते बर्फासारखे थंड असते, थोडावेळ झाला म्हणजे ते गरम-गरम होऊ लागते. म्हणजे हे सायन्स आहे, चमत्कार नाही! एक तर जे आपण जाणत नाही ते हे विज्ञान आहे किंवा दुसरे काही त्यांची हातचालाखी आहे. आणि कोणी असे करतो तेव्हा आपण असे म्हणू शकतो की 'धन्य आहे तुमची हातचालाखी की माझ्या सारख्याला पण तुम्ही गोंधळून टाकतात!' इतके म्हणू शकतो, पण 'तुम्ही चमत्कार करतात' असे म्हणू शकत नाही!

## तळलेली भजी कागदाच्या कढईत!!!

मी अठ्ठावीस वर्षांचा होतो तेव्हा माझे आठ-दहा मित्र बसलेले होते, तेव्हा चमत्काराची गोष्ट निघाली. त्यावेळी तर माझ्यात अहंकारी गुण होता ना, म्हणून अहंकार लगेच उफाळत असे. अहंकार प्रकट झाल्याशिवाय राहत नाही. म्हणून मी म्हणालो, 'काय हे तुम्ही चमत्कार-चमत्कार बोलत आहात? घ्या, मी करून दाखवतो चमत्कार.' तेव्हा सगळे म्हणाले, 'तुम्ही कोणता चमत्कार करता?' त्यावर मी म्हणालो, 'हा कागद आहे, या कागदाच्या कढईत मी भजी तळून दाखवू का, बोला!' तेव्हा सगळे म्हणाले, 'अरे, असे कधी होते का? हे काय वेड्यासारखे बोलताय?' मी म्हणालो, 'कागदाची कढई बनवून, त्यात तेल ओतून, स्टोव्ह वर ठेवून भजी तळून देतो आणि तुम्हा सर्वांना एक-एक खाऊ घालतो.' तेव्हा सगळे

म्हणाले, 'आमची शंभर रुपयांची पैज.' मी म्हणालो, नाही. 'हे पैजेसाठी करायचे नाही. आम्हाला घोडेस्वारी करायची नाही. शंभरच्या ऐवजी दहा रुपये काढ. नंतर मग आपण चहा-नाश्टा करू.' आणि त्या काळात तर दहा रुपयात खूप काही मिळत असे!

आमच्या इथे बडोद्यात एक न्याय मंदिर आहे, तिथे एक सेन्ट्रल हॉल होता. तिथे एका मित्राची ओळख होती. म्हणून त्या हॉलमध्ये हा प्रयोग करण्याचे ठरले. तशी तिथे फारशी माणसे जमली नव्हती. आम्ही दहा, आणि इतर पाच-पंचवीस माणसं होती. तेव्हा तिथे मी हा प्रयोग केला. तिथे एक स्टोव्ह मागवला, कागदाची कढई बनवली आणि भजीचे पीठ कालवले. तसे तर मला भजी बनवता येत होती. लहानपणी खाण्याची सवय ना, म्हणजे घरी कोणी नसेल तेव्हा आपण स्वत: बनवून खाऊन घ्यायचे. मग या इथे मी तेल ठेवले आणि नंतर कढई स्टोव्ह वर ठेवतेवेळी अगोदर मी काय केले ? असे केले. हात खालीवर करून जादुमंतर करतात तसा अभिनय केला. म्हणून मग ते सर्वजण असे समजले की ह्याने काही मंत्र उच्चारला! कारण असे नाही केले तर लोक घाबरले असते. म्हणून त्यांना हिंमत रहावी त्यासाठी केले. नाहीतर त्यांच्या भीतीचा परिणाम माझ्यावर झाला असता, सायकोलॉजी असते ना? की आता पेटेल, जळून जाईल! तो मंत्र उच्चारला ना, म्हणून ते लोक उत्कंठतेने एकटक पाहतच होते की काहीतरी मंत्र उच्चारला असेल! मग मी कढई स्टोव्ह वर ठेवली. पण काही पेटली नाही म्हणून त्यांना वाटले की निश्चितच मी काही मंत्र उच्चारला! तेल उकळले की मग मी एक-एक भजी आत टाकत गेलो. भजी तर आत तळू लागल्या! अशा प्रकारे मग दहा-बारा भजी तळल्या आणि सगळ्यांना एक-एक भजी खाऊ घातली. कदाचित थोड्याफार कच्च्या राहिल्या असतील कारण की त्या मोठ्या होत नाही ना! भांडे छोटे ना! हे तर फक्त त्यांना एवढे समजवण्यासाठी करायचे होते की असे होऊ शकते. नंतर सगळे मला म्हणू लागले की, 'तुम्हाला तर चमत्कार करता येतो, त्याशिवाय हे कसे शक्य आहे ?' मी म्हणालो, 'हे जर तुला शिकविले तर तू सुद्धा करू शकशील. म्हणजे जे दुसऱ्यांना येते, त्यास चमत्कार म्हणू शकत नाही.'

मी तुम्हाला एकदा कागदाच्या कढईत भजी करून दाखवली म्हणजे मग तुम्ही सुद्धा लगेच करू शकाल. तुम्हाला श्रद्धा बसली पाहिजे की हे मंत्र बोलल्याशिवाय होत आहे. मग तुम्ही करू शकाल!

म्हणजे असा कोणीही नाही की ज्याला चमत्कार करता येतो. हे तर सारे विज्ञान आहे. विज्ञानाचा स्वभाव आहे, की ज्या कागदात तुम्ही तेल घातले तर कोणत्या स्थितीत कागद जळतो आणि कोणत्या स्थितीत जळत नाही, हे विज्ञान जाणते. खाली स्टोव्ह चालू आहे, वर तेल आहे पण कोणत्या स्थितीत कागद जळत नाही! हा तर मी स्वत: अनुभव घेतला आहे.

**प्रश्नकर्ता :** कागद जळाला नाही, ते कसे काय ?

**दादाश्री :** त्याची रीत नाही, हा तर कागदाचा स्वभावच असा आहे की जर कागदाखाली थोडे जरी तेल चिकटलेले असते ना, तर कागदाने पेट घेतला असता.

**प्रश्नकर्ता :** पण कागद तर तेल शोषतो ना ?

**दादाश्री :** हो, तेल शोषतो. आत तेल शोषले आहे असे दिसते आपल्याला. त्याचा डाग दिसतो पण तेल गळताना दिसत नाही. आश्चर्य आहे हे एक! आणि हा कागदाचा वैज्ञानिक स्वभाव आहे! पण बुद्धी तर असेच सांगते ना की कागदाला अग्नी जाळतो. आणि तेलवाले कागद असल्यामुळे लवकर पेट घेणार. पण तसे नाही, कागदाच्या खाली जर तेल टपकले असते तर ते जळाले असते. म्हणजे विज्ञानाच्या कित्येक गोष्टींना जाणले पाहिजे. इथे तर त्यांची मती पोहचत नाही, म्हणून यास चमत्कार मानून लोक स्वीकार पण करतात! ज्यांची मती पोहचत असेल, त्यांना दुसरे विचारही येतात! हे मोठमोठे आरसे ठेवतात ते धडाम करून फूटतात! त्यास सर्व लोक चमत्कार केला असे म्हणतात. पण ही तर सारी औषधे आहेत विज्ञानाची!!

अर्थात् कोणी देहधारी माणूस चमत्कार करू शकत नाही. किंवा आपण त्या विज्ञानाचे जाणकार नसलो तर तो विज्ञानी मनुष्य आपल्याला

मूर्ख बनवतो की, 'हे पाहा मी करतो.' म्हणून आपल्यालाही असे वाटते की हा चमत्कार केला आणि विज्ञान जाणल्या नंतर तो चमत्कार दोन टक्क्याचा!

## भगवंतांनी सुद्धा भोगले कर्म

अर्थात् ही सर्व फसवणूक आहे. आणि सगळ्यांचे ऐकावे पण ते जर 'सायन्स' मान्य करेल असे असेल तरच मानावे. असेच फक्त खोटेनाटे चालत नाही. असे खोटेनाटे नसावे. कारण की कृष्ण भगवंतांना तुम्ही ओळखता का? हे कृष्ण भगवंत असे पायावर पाय ठेवून झोपले होते आणि त्या पारध्याला असे वाटले की हे हरीण आहे. म्हणून त्या बिचाऱ्याने बाण मारला. आणि तो बाण लागल्यामुळे भगवंतांनी देह सोडला ही गोष्ट माहित आहे? ते तर नारायण स्वरुप होते. हे माहित आहे का तुम्हाला? तुम्हाला त्यांची जेवढी किंमत नसेल, तेवढी किंमत आम्हाला आहे. कारण की नारायण स्वरुप म्हणजे नराचे नारायण झालेले पुरुष! कोण ते पुरुष! शलाका पुरुष, वासुदेव नारायण! तर वासुदेव नारायणांची अब्रू घेईल असे हे जग, तेव्हा दुसऱ्यांची तर काय बरोबरी? म्हणजे दुसरे लोक तर उगाचच ऐटीत फिरतात ना! तुम्हाला समजतय ना?

## द्रौपदीच्या चीरचा चमत्कार?

**प्रश्नकर्ता :** तरी सुद्धा कृष्ण भगवंताने द्रौपदीला वर राहून चीर (वस्त्र) पुरवले होते, असे सांगतात ना?

**दादाश्री :** अरे, ह्या तर वेडेपणाच्या गोष्टी, द्रौपदीचे वस्त्र ओढले आणि कृष्ण भगवंताने पुरवले( !) आणि आपले लोक हे मानूनही घेतात. अरे, पण कोणत्या मीलचे कापड होते?!

**प्रश्नकर्ता :** पण एक गोष्ट तर आहे, की अशा गोष्टीमुळे प्रजेत धार्मिक भावना टिकून राहते ना?

**दादाश्री :** धर्माची भावना टिकून राहते, ती तर कित्येक वर्ष टिकून राहिली आणि नंतर त्याची 'रिएक्शन' आली. असे होत असेल का? उलट

धर्मापासून दुरावले हे लोक! म्हणून वैज्ञानिक, खरी रीतच असली पाहिजे की जेणे करून भावना जरी उशिरा बसली पण कायमसाठी टिकून राहील. तो दिखावा तर नाही चालणार. दिखावा किती वर्षे चालेल? पण तरीसुद्धा आपल्या हिंदुस्तानात हे सर्व असेच केलेले आहे. असे ठोकमठोक करूनच दिखावा चालविला. 'असा दिखावा कशासाठी करता? तुम्हाला काय पाहिजे आहे, की ज्यासाठी तुम्ही असा दिखावा करता? तुम्ही कशाचे भिकारी आहात?' असे आपण विचारले पाहिजे. आणि आपल्या 'इथे' तर कसे आहे? अजिबात पोलम्पोल (दिखावा) नाही ना! म्हणजे असे निर्मळ होईल तेव्हाच हिंदुस्तानाचे दिवस पालटतील!

## चमत्काराला नमस्कार करतात ते.........

एक माणूस आम्हाला बडोद्यात सांगू लागला, म्हणाला की, 'दादा, काही चमत्कार करा ना. म्हणजे संपूर्ण जग इथे येईल.' पण मी म्हणालो, 'या जगातील लोक चमत्कार केला म्हणजे नमस्कार करण्यासाठी येतात, पण गायी, म्हशी, मेंढ्या, कुत्रे चमत्काराला नमस्कार करतात का? फक्त हे मनुष्यच इथे येतील. आणि जे चमत्काराला नमस्कार करतात ते तर गायी-म्हशींपेक्षाही निकामी आहेत! नाहीतर इथे आम्ही फक्त एकच साधना केली ना, तर हे टेबल सारखे उड्याच मारत राहील. पण त्यामुळे मग सगळेच लोक येथे जमा होतील, तेव्हा आपण त्यांना काय उत्तर देऊ? आणि जमावाचे करायचे तरी काय? यामधून निवडून-निवडून-निवडून मोती, खरे हिरे काढून घ्यायचे आहेत! ह्या दुसऱ्या सर्व कचऱ्याचे काय करायचे? नाहीतर हे टेबल चारही पायांनी उड्या मारेल, आपोआप, काही यंत्र ठेवल्याशिवाय उड्या मारु शकेल असे आहे, हे सायन्स आहे. आजचे सायन्टिस्ट नाही समजू शकणार की कोणते सायन्स आहे हे!! हे 'रियल सायन्स' आहे. आणि त्या लोकांचे ते रिलेटिव सायन्स आहे. आता हे त्यांना कसे काय समजणार बिचाऱ्यांना?

म्हणून 'दादा' चमत्कार करतात असे लोकांनी ऐकले ना तर सारा उलटा माल घुसेल, खोटा माल सगळाच इथे येईल! हा चमत्कार पाहण्यासाठी जो बुद्धिवंत वर्ग आहे ना, तो तर इथे येणारच नाही. कोणता

वर्ग येईल? चमत्काराला मानणारीच सर्व माणसे येतील! खरी माणसे चमत्कार पाहू इच्छिणारच नाही. बुद्धिवंत वर्ग जर चमत्काराची गोष्ट ऐकेल ना, तर तिथून पळून जाईल. बुद्धिवंतांना चमत्कार चालतच नाही. चमत्कार तर जादू आहे, मूर्ख बनविण्याचे धंदे आहेत हे सर्व!

## चमत्कार म्हणजे अंधश्रद्धा

**प्रश्नकर्ता :** सत्पुरुष चमत्कार करतात का?

**दादाश्री :** सत्पुरुष चमत्कार करीत नाहीत आणि जे चमत्कार करतात ते सत्पुरुष नाहीत, ते मग जादुगार म्हटले जातील.

**प्रश्नकर्ता :** पण मुक्ती साधनेत सफलता प्राप्त करणारे चमत्कार तर घडवू शकतात ना?

**दादाश्री :** त्यांचे चमत्कार असे नसतात, त्यात असे कुंकु काढणे किंवा असे-तसे काही चमत्कार नसतात. त्यात तर जगात पाहण्यात आले नसेल असे परिवर्तन आपल्या अनुभवास येते. पण त्यासही आपण चमत्कार म्हणू शकत नाही. हे चमत्कार तर जादुगिरी म्हटली जाते!

**प्रश्नकर्ता :** पण दादा, एका संताने आंब्याचे पान घेऊन चमत्कार करून दाखवला होता. असे दोन चमत्कार मी स्वत: पाहिले आहेत!

**दादाश्री :** हो. पण ते जे पान मागवले, ते कशाचे पान मागवले? आंब्याचे ना? आता त्याच्या बदल्यात जर आपण सांगितले की, 'भाऊ, हे महुव्याचे पान आहे, ते घे'. तेव्हा तो म्हणेल, 'नाही, हे नाही चालणार. मला आंब्याचे पान द्या!' म्हणजे आपण जर म्हटले की हे महुवाचे पान घेऊन तू असा चमत्कार करून दाखव तर ते नाही होणार. म्हणजे हे सर्व एविडन्स आहेत. हे 'स्टील' तर असे आहे की लाख चमत्कार केले तरीही वाकणार नाही!

**प्रश्नकर्ता :** तर हे जे सर्व काढतात, भस्म, घड्याळ, कुंकू, आणि तांदूळ वगैरे, ही सर्व जादुगिरी आहे की चमत्कार आहे?

**दादाश्री :** जादुगिरी, हातचालाखी! आपल्याला समजत नाही म्हणून

असे वाटते की हा चमत्कार केला. पण चमत्कार होणे कसे शक्य आहे? त्याला शौचाला जाण्याची शक्ति नाही, तो कसा काय चमत्कार करणार? वाटेल तो असेल पण त्याच्यात शौचाला जाण्याची शक्ति असेल तर मला सांग की माझ्यात ती शक्ति आहे आणि तीच जर नसेल तर तू चमत्कार कसा करशील?

**प्रश्नकर्ता :** तर मग जीवनात चमत्काराचे स्थान किती? चमत्कार अंधश्रद्धेकडे घेऊन जातो का?

**दादाश्री :** ही सगळी अंधश्रद्धा तोच चमत्कार. म्हणजे चमत्कार करतो ना, हे सांगणाराच अंधश्रद्धाळू आहे. स्वत: स्वत:लाच मूर्ख बनवतो तरीही नाही समजत! मी तर इथपर्यंत तुम्हाला शिकवतो की आपण चमत्कार करणाऱ्याला विचारावे की, 'साहेब, तुम्ही कधी शौचाला जाता का?' तेव्हा तो म्हणेल 'हो.' तर आपण त्यांना विचारावे, 'तर ते तुम्ही बंद करू शकता का? किंवा त्याची सत्ता तुमच्या हातात आहे?' तेव्हा म्हणेल, 'नाही.' मग जर तुमच्यात शौचाला जाण्याचीही शक्ति नाही, तर कशासाठी तुम्ही ह्या लोकांना मूर्ख बनवता? असे म्हणावे.

अर्थात् चमत्काराचे जीवनात स्थान नाही! चमत्कार करण्याची शक्ति मनुष्यात कशी असू शकेल? भगवंतामध्ये ही शक्ति नव्हती. कृष्ण भगवंतांसारखे श्रेष्ठ पुरुष चमत्कारासाठी काही बोलले नाहीत आणि ही सामान्य माणसे विनाकारण बोलत राहतात! हे जास्तीचे बोलण्याचे कारण काय आहे, तर ह्या लोकांनी हिंदुस्तानावर खूप अत्याचार केला आहे! असे व्हायला नको. मला त्या लोकांवर चीड नाही, कोणावरही मला चीड नाही. मनुष्य जे करतो, ते सर्व कर्माधीन आहे. पण तुम्ही त्यास सत्य मानवून घेता? असे का करता? काय फायदा मिळवायचा आहे तुम्हाला? फायदा करून घेण्यासाठीच तुम्ही असे करता ना? ज्याला फायदा करून घ्यायचा नसेल, तो सांगतो का काही? आणि तरीही त्या सिलोनवाल्या वैज्ञानिकाने सांगितले की 'चमत्कार सिद्ध करून द्या, तर मी त्याला एक लाख रुपयांचे बक्षिस देईन.' तेव्हा का कोणी लाख रुपये घेण्यासाठी गेले नाही? तेव्हा हे सगळे कुठे गेले होते? कारण तेथे विचारणारे असतात ना, लाख रुपये

देणारा कोणी असा-तसा असतो का ? हे विचारेल, ते विचारेल, त्याचे हाल करून सोडेल. त्यावेळी तर सगळेच पळून गेले.

मोठ-मोठे 'जज' तिथे बसले असतील, ते तर लगेचच पकडतील की हे चमत्कार इथे नाही चालणार. ह्या लोकांनी चमत्कारा विषयी खूप खोटे ठसवून दिले आहे पण आपले लोकही लालची आहेत ! म्हणून तर ही सगळी भानगड आहे ना ! फॉरेनमध्येही चमत्कार चालतात. ते सुद्धा थोडे-थोडे लालची आहेत. हा 'माझा मुलगा आहे ना, त्याला मुलगा नाही' असे म्हणतात. अरे, तुला तर मुलगा आहे ना ? हे लटांबर कुठपर्यंत चालेल ? हे तर एका दुधी नंतर दुसऱ्या दुधी उगवतच राहतात. एकच दुधी उगवणार आहे का ? वेल वाढली तितक्या दुधी उगवतच राहणार. बस, ही एकच लालूच, 'माझ्या मुलाच्या घरी मुलगा नाही.'

बाकी, चमत्कारासारखे काहीच नाही आणि तू चमत्कार करणारा असशील तर असा चमत्कार कर ना की भाऊ, या देशात बाहेरील देशातून धान्य मागवावे लागणार नाही. एवढे केलेस तरी खूप झाले. असा काही चमत्कार कर. हा तर नुसता भस्म काढतो, घड्याळ काढतो, आणि लोकांना मूर्ख बनवतो ! दुसरे चमत्कार का नाही करत ? त्याचे तेच घड्याळ आणि तेच तेच भस्म ! आणि काही काढून दिले, अमके काढून दिले, घड्याळ काढून दिले, तर आपण सांगावे ना की भाऊ, त्यापेक्षा तू धान्य काढ ना, फॉरेनहून आणावे तर लागणार नाही !

**प्रश्नकर्ता :** हे सर्व लोक जे चमत्कार करतात, तर असे चमत्कार करून ते काय सिद्ध करू इच्छितात ?

**दादाश्री :** चमत्कार करून त्यांची स्वत:ची महती वाढवतात. महती वाढवून या दिशाभूल झालेल्या( अंधानुकरण करणाऱ्या )लोकांपासून स्वत:चा लाभ उठवतात. पाच इंद्रियांच्या विषयासंबंधी सगळा लाभ उठवतात. आणि कषाय संबंधीही लाभ उठवतात, सर्व प्रकाराचा लाभ उठवायचा आहे, म्हणून आपण 'चमत्कार' वस्तुलाच उडवून देऊ इच्छितो की, भाऊ अशा चमत्कारात फसू नका. पण लालूच असल्यामुळे हा दिशाभूल झालेला प्रवाह तर फसणारच आहे, आणि कोणीही व्यक्ति जर लालची असेल

तर त्याला बुद्धिवंत म्हणूच शकत नाही. बुद्धिवंतांना लालूच नसते, आणि लालूच असेल तर बुद्धी नाही!

## ते प्रकट करते धर्मभावना

आणि कित्येक संत म्हणतात, 'अरे, असे होऊन गेले, निरंतर अंगारा पडत राहतो.' अरे पण मला अंगाऱ्याचे काय काम आहे? मला श्रद्धा बसेल असे काही बोला. अशी अंगाऱ्याची श्रद्धा किती दिवस टिकेल? तू असे काही बोल की ज्यामुळे मी तुझ्यापासून दूर जाणार नाही! पण बोलण्याची शक्ति उरली नाही म्हणून तर राख पाडावी लागली!

चमत्कार करून भस्म काढतात, आणि अमके काढतात. आता हे जे करतात, ती त्यांची एक प्रकारची साधना आहे! आणि त्याने लोकांना धर्माच्या मार्गावर वळवतात. म्हणून मी लोकांना सांगितले होते की, 'भाऊ, ते चांगले आहे'. असे असेल तर त्याचे खंडन करू नका. कारण ज्या लोकांना धर्माची काहीच समज नाही, त्या लोकांना धर्माच्या मार्गावर आणतात, धर्मासाठी प्रेरित करतात आणि फिट(लायक) बनवतात, तर ते चांगलेच आहे!' म्हणजे तिथे जाणारे परत माझ्याकडे येतात, मला भेटतात तेव्हा मी सांगतो, तिथे जा. कारण की ते तुम्हाला प्रगती पथावर नेतील. त्यांच्यात एवढी शक्ति आहे की ते तुमची श्रद्धा जिंकून घेतात. ते तुम्हाला असे नाही सांगत की माझ्यावर श्रद्धा ठेवा. ते तर चमत्कार करून लगेच तुमची श्रद्धा बसवतात. पण ते, 'लो स्टॅन्डर्ड' करिता आहे, 'हायर स्टॅन्डर्ड' च्या माणसांसाठी ते नाही. 'हायर स्टॅन्डर्ड' वाल्यांची बुद्धी विकसित झालेली असते, म्हणून तिथे जाऊ नका. बुद्धी विकसित नसेल तर तिथे जावे. म्हणजे प्रत्येक प्रकारची माणसं असतात. 'स्टॅन्डर्ड' तर प्रत्येक प्रकारचे असते ना? तुम्हाला काय वाटते?

**प्रश्नकर्ता :** ते भक्त मग पुढच्या जन्मात ज्ञानी होणार आहेत का?

**दादाश्री :** अजून तर पुष्कळ जन्म होतील, तोपर्यंत असेच्या असेच चालू राहील. त्यानंतर विकसित बुद्धिच्या विभागात येतात आणि विकसित झालेल्या बुद्धिच्या विभागात तर कित्येक जन्म होतात, तेव्हा ते हळूहळू ज्ञानाच्या मार्गावर येतात!

आम्ही अमेरिकेत गेलो होतो तेव्हा एक व्यक्ति मला म्हणाला की, 'मला आत्मज्ञान जाणायचे आहे!' मी विचारले, 'सध्या काय करता?' तेव्हा तो म्हणला, 'ह्या संतांनी सांगितल्याप्रमाणे करतो.' मी म्हणालो, 'त्यामुळे तुम्हाला काय मदत झाली?' त्यावर तो म्हणाला 'आम्ही डोळे मिटतो तेव्हा आम्हाला ते दिसत राहतात.' मी म्हणालो, 'तिथे स्थिरता राहत असेल, तर माझ्याकडे येण्याची काय गरज आहे? माझ्याकडे तर, तुम्हाला स्थिरता राहत नसेल तर या.' ज्याला जिथे कुठेही स्थिरता राहत असेल, त्याला विनाकारण स्थिरता सोडवून येथे येऊ दिले, तर तू ती फांदीही सोडून देशील आणि ही फांदीही सोडून देशील, तेव्हा मग तुझी काय अवस्था होईल? आपण सांगितल्याने तो ती फांदी सोडून देईल आणि जर ही फांदी पकडू शकला नाही, तर? हिशोब बिघडेल ना मग सर्व?! जो एका जागी रंगलेला असेल, त्याला मी इथे येण्यासाठी मनाई करतो, पण ज्याला कोणत्याही गोष्टीत संतोष वाटतच नाही, त्याला सांगतो, की 'भाऊ, तू इथे ये!' संतोष होत नसेल त्यालाच! कारण की 'क्वॉन्टिटी' साठी हा मार्ग नाही 'क्वॉलिटी' साठी आहे. 'क्वॉन्टिटी' म्हणजे मला इथे लाख माणसे गोळा करायची नाही. काय करायचे लाखो लोक गोळा करून? मग बसायला जागाही मिळणार नाही, आणि तुमच्यासारख्यांना, ह्या सर्वांना इथे कोण बसू देईल? इथे तर क्वॉलिटीची गरज आहे, क्वॉन्टिटीची नाही. तरीही हळूहळू करत इथे पन्नास हजार माणसे झाली आहेत. आणि जर क्वॉन्टिटी शोधण्यास गेलो असतो तर पाच लाख माणसे जमा झाली असती! मग आम्ही काय करावे? कुठे बसवावे सगळ्यांना? येथे बसण्याचे स्थळही नाही. हे तर ज्यांच्याकडे जातो, तेच स्थळ. कुणाच्या तरी घरी जात असतो ना? कारण आपल्या इथे तर काय सांगितले जाते की, 'जे सुख मी प्राप्त केले, ते सुख तू प्राप्त कर आणि संसारातून सुटका करून घे.' बस, आपल्या इथे दुसरा मार्ग नाही.

म्हणजे एखादा धर्म असा असतो की त्यात कित्येक माणसांना भीती दाखवून कुसंग मार्गापासून वळवले जाते आणि त्यांना सत्संगात ढकलले जाते, असे चमत्कार चांगले आहेत. जे लोक कुसंगींना धर्मात आणण्यासाठी त्यांना भगवंताच्या नावावर घाबरवतात, तर आपण त्यांना एक्सेप्ट करतो की

त्या लोकांना घाबरवून का होईना पण धर्मात आणले जाते. त्यास हरकत नाही, ते चांगले आहे. त्यांची दानत खोटी नाही. कुसंग म्हणजे शिव्या देत असेल, पत्ते खेळत असेल, चोरी करत असेल, बदमाशी करत असेल, त्यांना भीती दाखवून सत्संगात आणले तर त्यास हरकत नाही. जसे आपण मुलांना भीती दाखवून योग्य मार्गावर नाही का आणत? या बालमंदिराचा मार्ग काढला तर ती गोष्ट वेगळी आहे. पण दुसरे जे चमत्काराने नमस्कार करवून घेऊ इच्छितात, त्या सर्व 'निरर्थक' गोष्टी आहेत. मनुष्याला असे शोभत नाही! बाकी, वीतराग सायन्स तर असे काही करतच नाही.

## देवतांचे चमत्कार खरे

**प्रश्नकर्ता :** कित्येकांजवळ अंगारा येतो ना?

**दादाश्री :** त्या अंगाऱ्यावाल्याला मी असे सांगेन की, 'मला अंगारा नको, पण तू ते स्पेनचे केशर काढ. मला जास्त नको, फक्त एक तोळाच काढ ना, तरी भरपूर झाले.' हे तर सगळे मूर्ख बनवतात.

आता इथे, या संदर्भात दुसरी पण एक गोष्ट आहे, जेणे करून आपण सर्वांनाच खोटे म्हणायचे नाही. कारण असे देवी-देवता आहेत की जे अंगारा टाकतात. त्यांच्याकडे अंगारा कसा असेल? पण ते तर इथून उचलून तिथे दुसऱ्या जागी टाकतात, आणि त्यांना वैक्रियिक शरीर (देवतांचे अतिशय हलक्या परमाणुंचे बनलेले शरीर जे कोणतेही रुप धारण करू शकते.) असते. आपल्याला ते समजतही नाही. असे चमत्कार देवी-देवताही करतात. म्हणजे यात एखाद्याने त्या देवाला साध्य केले असेल, त्यामुळे असे घडते. पण तरी तो चमत्कार नाही. त्यासाठी कोणाची तरी मदत घेतलेली आहे, बस! चमत्कार तर स्वत: स्वतंत्र रितीने करत असेल, तो आहे. आता हे मी सांगत आहे, या प्रमाणे तर एकच टक्का लोक करीत असतात, दुसरे सर्व एक्जेगरेशन(अतिशयोक्ति) आहे. नव्याण्णव टक्के सर्व खोटे एक्जेगरेशन आहे, अगदीच!

आपल्या हिंदुस्तानात कित्येक संत आहेत, ते अंगारे काढतात. पण तो देवी-देवतांचा आहे, त्यात बनावट नसते, पण त्यात चमत्कारासारखे काही नाही.

## तो नाही माझा चमत्कार

एकदा पालीताणा येथे भगवंतांच्या मंदिरात मोठ्याने त्रिमंत्र बोलवून घेतले. त्रिमंत्र मी स्वत: बोललो आणि त्यानंतर तांदूळ आणि असे सर्व पडले. तेव्हा लोक म्हणाले, 'अरे..... चमत्कार झाला.' मी म्हणालो. 'हा चमत्कार नाहीच. त्यामागे करामती आहेत.'

**प्रश्नकर्ता :** कोणाच्या करामती आहेत ?

**दादाश्री :** देवी-देवता सुद्धा यात थोडी काळजी घेतात. लोकांचे मन जेव्हा धर्मापासून विमुख होते ना, तेव्हा देवी-देवता असे काही करून लोकांना धर्माकडे वळवतात, श्रद्धा बसवून देतात. आता असे कधीतरीच घडते, आणि जे शंभरवेळा घडते त्यात नव्याण्णव वेळी तर एक्जेगरेशन आहेत या लोकांचे. पण त्यांचा हेतू खोटा नाही. म्हणून आपण त्यांना गुन्हेगार मानत नाही. त्यात काय वाईट हेतू आहे ? लोकांना या बाजूने वळवतात ते चांगलेच आहे ना!

आता तिथे तांदूळ पडले तेव्हा एका माणसाच्या डोक्यावर तांदूळ पडले नाहीत. म्हणून तो मला म्हणला की, आज सकाळी मी तुमचे सांगितलेले ऐकले नाही, त्याचे हे मला फळ मिळाले.' आता हेही खोटे होते आणि तो चमत्कार केला तेही खोटे होते. मी असे काही केलेच नव्हते.

**प्रश्नकर्ता :** मंदिरात जेव्हा दादा त्रिमंत्र बोलले तेव्हाच तांदूळ पडले, असे का झाले ?

**दादाश्री :** ते निमित्त असे बनते ना! मी पाहतो ना, तेव्हा ते वरुन टाकतात.

**प्रश्नकर्ता :** दादा निमित्त तर आहेतच ना ?

**दादाश्री :** ते तर कदाचित आमच्या उपस्थितीने खुष होऊन कधी असे काही पडते, पण त्यात मी काही केले नव्हते!

**प्रश्नकर्ता :** हा चमत्कार म्हटला जाणार की नाही ?

**दादाश्री :** नाही. हा चमत्कार म्हटला जाणार नाही. देवता असे

सर्व करतात. त्यामागे सुद्धा फक्त हा एकच हेतू आहे की, लोकांची श्रद्धा बसावी.

**प्रश्नकर्ता :** हो, मनुष्य करेल तो चमत्कार म्हटला जाणार नाही. पण मग देवी-देवता करतील तोही चमत्कार म्हटला जाणार नाही ?

**दादाश्री :** जर ते देव चमत्कार करू शकत असतील तर मग इथे मनुष्यात कशासाठी येतील ? त्यांना तर अवधिज्ञान सुद्धा आहे ना, जेव्हा त्यांची जाण्याची वेळ येते तेव्हा त्यांची माळ सुकते.... म्हणून त्यांना दु:ख वाटते की अरेरे ! हे तर आता तेलीच्या घरी माझा जन्म आहे ! तुम्ही जर चमत्कार करणारे आहात, मग इथे कशासाठी जन्म घेता ? तिथेच बसून राहा ना !

फक्त तीर्थंकरच असे आहेत की, ते अशक्य गोष्ट करू शकतात, जे दुसऱ्यांना शक्य नाही. त्यांच्यात तेवढे सामर्थ्य आहे. पण असे केले तर त्यांचे तीर्थंकरपद निघून जाते; लगेच गमवून बसतील !

**प्रश्नकर्ता :** तर या दोन वस्तू वेगळ्या झाल्या. जी हातचालाखी म्हणतात, जादुगिरी म्हणतात, त्यास चालाखी म्हटले, आणि ही तांदूळाची वृष्टी झाली, ती तर देवांची कृपा आहे.

**दादाश्री :** हो, त्यास कोण नाही म्हणत आहे ? ती तर आहेच ना ! पण त्यास आपण चमत्कार म्हणत नाही. ही तर देवांची कृपा दिसून येते. पण आपल्या लोकांना ही जी चमत्कार शब्द बोलण्याची सवय आहे, ती आम्ही मोडू इच्छितो !

## मूर्तिमधून अमृतवर्षा....

**प्रश्नकर्ता :** आता कित्येक ठिकाणी मूर्तिंची प्राण प्रतिष्ठा करतात, त्यावेळी अमृतवर्षा होते, तर ही काय वस्तू आहे ?

**दादाश्री :** ज्यांची प्रतिष्ठा करतात ना, त्यांचे शासनदेव असतात, ते शासनदेव त्यांचे माहात्म्य वाढवण्यासाठी सर्व उपाय करतात. जेवढी मते आहेत, तेवढे त्यांचे शासनदेव असतात. ते शासनदेव आपापल्या धर्मांचे रक्षण करतात.

**प्रश्नकर्ता :** इथे शेजारी एक मंदिर आहे, तिथे महोत्सव सुरु आहे. तर दोन दिवसांपूर्वी तिथे अमृतवर्षा झाली होती आणि ती दोन-तीन तासांपर्यंत चालली. पुन्हा आज असेही सांगतात की तिथे केशराचे शिंतोडे पडले आहेत. तिथे खूप पब्लिक जमा झाली आहे.

**दादाश्री :** पण घरी जाऊन आपले मतभेद तर तसेच राहिले ना! क्रोध-मान-माया-लोभ त्याचे तेच राहिले. म्हणजे अमृतवर्षा होवो की न होवो, त्यामुळे आपल्यात काही बदल झाला नाही!

**प्रश्नकर्ता :** पण अमृतवर्षा झालेली जी मूर्ति असते, त्याचे दर्शन केल्याने काहीतरी लाभ तर होत असेल ना, दादा?

**दादाश्री :** लाभ होत असेल तर घरी गेल्यावर मतभेद कमी झाले पाहिजेत ना? अशी अमृतवर्षा पुष्कळ वेळा झाली आहे, पण मतभेद कोणाचेही कमी झालेले नाहीत. आपले मुख्य काम काय आहे की मतभेद कमी झाले पाहिजेत. क्रोध-मान-माया-लोभ कमी झाले पाहिजेत, आणि शांती वाढली पाहिजे. एवढे मुख्य काम आहे ना? ती अमृतवर्षा होवो की न होवो, त्याच्याशी आपले काय काम आहे? पण तरी हे असे सर्व देवता करीत असतात. म्हणून आपण त्यास खोटे म्हणू शकत नाही. परंतु आपले क्रोध-मान-माया-लोभ घटत नाहीत, मग त्याचा आपल्याला काय उपयोग?

**प्रश्नकर्ता :** पण दादा, यात आपले ज्ञान घेतलेल्या महात्म्यांनी काय समजावे?

**दादाश्री :** महात्मा या भानगडीत कशासाठी पडतील? तिथे केशर ओतले जात असेल तरीही महात्मा कशासाठी बघायला जातील? असे ढीगभर केशर वाहत असेल तरीही कशासाठी बघायला जातील? उगाचच वेळ वाया जाईल! असा वेळ वाया घालवून काय फायदा? आपण शुद्ध उपयोगात का राहू नये? नाही रहावे? ज्याला शुद्ध उपयोग मिळाला आहे, तो तर शुद्ध उपयोगातच राहणार ना? हे तर ज्याला श्रद्धा बसत नसेल, त्याची श्रद्धा बसविण्यासाठी देवलोक करतात, किंवा दुसरे लोकही करतात! कित्येक वेळी तर देवलोकही करत नाहीत, त्यास मनुष्य चमत्कार

सांगून कारस्थान करतात आणि विनाकारण गोंधळ वाढतात! पण त्यात त्यांचा हेतू चुकीचा नाही, कारण त्यामुळे लोक दर्शन करायला येतात ना! पण आपल्याला याची गरज नाही. आपल्याला त्याचा काय फायदा?

**प्रश्नकर्ता :** शेजारी मंदिर आहे, तर सगळे सांगतात की दर्शन करण्यास जा. म्हणून आम्ही तर 'दादा भगवानांच्या' साक्षीने दर्शन करून आलो.

**दादाश्री :** त्यास हरकत नाही. आपण मूर्तिचे दर्शन करू शकतो. पण वरुन असे अमृत पडो की दुसरे काही पडो, त्याच्याशी आपल्याला काय देणे-घेणे? आपले क्रोध-मान-माया-लोभ कमी झाले की नाही, शांती झाली की नाही, ते बघण्याची गरज आहे.

म्हणून तर कृपाळुदेवांनी सांगितले की, धर्म त्यास म्हणतात की, धर्माच्यारुपात परिणमीत होईल. जर परिणाम दिसत नसेल तर त्यास आपण धर्म कसे म्हणू शकतो? अनंत जन्मांपासून येणे-जाणे केले, धावपळ केली, पण जसे होतो तसेच राहिलो. बाकी क्रोध-मान-माया-लोभ कमी झाले, आत मतभेद कमी झाले, शांती वाढली तर आपण समजू की यात काहीतरी भले झाले, कर्म बांधणे थांबले. आणि हे तर नुसते कर्मच बांधले जात आहेत. म्हणून जरी अशी अमृत वर्षा झाली, पण आपल्याला त्याचा काय उपयोग!

## कुंकूच्या ऐवजी केशर पाडा ना!

म्हणजे अमृत पडू दे की वाटेल ते होऊ दे, पण त्यास आपण 'चुकीचे आहे' असे म्हटले नाही. तसे कित्येक ठिकाणी केशर पडते, कित्येक ठिकाणी कुंकू पडते. केशर तर पडत नाही, पण कुंकू तर पडतेच. केशर थोडे महाग आहे म्हणून नाही पडत. हो, केशराचे शिंतोडे असतात पण असे ढिगभर केशर पडत नाही. आणि केशर पडत असेल तरीही त्यात काय वाईट आहे? आपण थोडे-थोडे घरी आणून काहीतरी बनवून खाऊ!!

आणि मी तर सरळ सांगतो की 'हे देवी-देवता, तुम्हाला माझा नमस्कार आहे पण हे जे तुम्ही शिंतोडे उडवता त्याची मला गरज नाही. तुम्हाला

तांदूळ टाकायचे असतील तर टाका आणि टाकायचे नसतील तरीही मला ते कामाचे नाही. मला तर क्रोध-मान-माया-लोभ कमी होतील आणि शांती होईल असे करून द्या.' असे सांगण्यास आपल्याला काय हरकत आहे बरं?

**प्रश्नकर्ता :** नाही, पण हे तर ज्याला श्रद्धा नसेल, त्याला भगवंतावर श्रद्धा बसावी म्हणून असे घडत असेल ना?

**दादाश्री :** हे तर अंधश्रद्धाळू लोकांना श्रद्धा बसविण्यासाठी आहे. अरे.... त्यात आणि कित्येक ठिकाणी तर.... रात्री मंदिरात घंटा वाजते, म्हणून मग दुसऱ्या दिवशी सगळे लोक दर्शन करण्यास येतात, अगदी धावत-पळत!! आणि मी तर सांगेन की तू लाख वेळा घंटा वाजवशील तरीही माझ्या काय कामाचे? मला तर आत गारवा (शांतता) उत्पन्न होईल असे होत असेल, तर येईन तुझे दर्शन करण्यास. नाहीतर मला ते काय उपयोगाचे? मला जरी खूप दु:ख होत असेल, तरीही मी तावडीत येणार नाही. यात लक्ष द्यायचे असते का? आपण काय लहान मूल आहोत की थोडासा प्रसाद दिला की धावपळ करायची? तुम्हाला समजतय ना?

बाकी, हे जग तर सर्व असेच आहे, लालची आहे आणि जर पेढे पडतील ना, तर संपूर्ण मुंबई तिथे जाईल. रुपये का पडत नाहीत? सोन्याचे नाणे पडले तर किती मोठे काम होईल! लगेचच लोकांची दरिद्रता संपेल ना? एक-एक नाणे जरी हातात आले तरी लोक बिचारे दुसऱ्या दिवशीच आंबे आणतील की नाही? पण हे तर तेच तेच भस्म पडत असेल काही ठिकाणी, तर काही ठिकाणी कुंकवाचे शिंतोडे पडत असतील!

या वीतराग मार्गात आत्मा प्राप्त होईल तरच खरे, अन्यथा सर्व निरर्थक आहे. आणि आत्मा प्राप्त करण्याची जर कोणती भूमिका असेल तर मनुष्यगती ही एकच भूमिका आहे. बाकी इतर कुठेही आत्मा प्राप्त होऊ शकेल अशी भूमिकाच नाही. तिथे तर भटकून-भटकून मरायचे आहे. अर्थात् आत गारवा झाला पाहिजे, शांती झाली पाहिजे. आपल्याला अशी खात्री झाली पाहिजे की आता माझा मोक्ष होईल! तुम्हाला अशी खात्री झाली आहे की मोक्ष होईल?

**प्रश्नकर्ता :** एकशे एक टक्के खात्री झालेली आहे!

**दादाश्री :** हो अशी खात्री झाली पाहिजे. आपला तर हा मोक्षमार्ग आहे आणि वीतरागींचा मार्ग आहे, चोवीस तीर्थंकरांचा मार्ग आहे! हे तर दुषमकाळातील लोक आहेत, म्हणून कर्मांनी फसलेले आहेत बिचारे. म्हणून तर ते माझ्याजवळ राहू शकत नाहीत. नाहीतर माझ्यापासून दूर सरकणारच नाहीत. असा गारवा (मन: शांती) देतात मग तिथून कोण दूर जाणार? पण कर्मांमुळे सर्व फसलेले आहेत आणि नुसत्या अमर्याद 'फाईली' आहेत. मग काय करतील!!

## कळस हालला.... तो चमत्कार?

**प्रश्नकर्ता :** कित्येक ठिकाणी लोक दरवर्षी यात्रेला जातात, आता तिथे एका मंदिराचा जो कळस आहे, त्याविषयी सर्व सांगतात की, तो कळस हालताना ती लोकं पाहतात तर ते काय आहे?

**दादाश्री :** त्यात जास्त खोलवर जाण्यासारखे नाही. ज्याला दिसते, त्याच्यासाठी ते बरोबर आहे. बाकी, आजचे सायन्स हे मान्य करणार नाही. आजचे सायन्स हे मान्य करेल का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** झाले मग! विज्ञान मान्य करेल तेवढीच गोष्ट खरी मानावी. दुसरी सर्व तर अंधश्रद्धा आहे. कित्येक देवी-देवता लोकांची श्रद्धा बसण्यासाठी चमत्कार करतात, तेव्हा असे काही घडते एखाद्या वेळेस. बाकी सर्वकाही सायन्टिफिक असले पाहिजे. हे 'सायन्स' जेवढे मान्य करेल तेवढेच मान्य करण्यासारखे आहे. 'सायन्स' च्या बाहेर काही नाहीच. कित्येक गोष्टी तर अंधश्रद्धाळू लोक गैरसमजुतीमुळे लोकांच्या मनात ठसवतात. जिथे-तिथे सर्वांनी, अज्ञानी प्रजेत श्रद्धा बसवण्यासाठी ही सर्व साधने तयार केली आहेत. हे समंजस लोकांसाठी नाही. ते तुमच्यासाठी नाही. ते सर्व तर दुसऱ्या लोकांसाठी आहे.

तो कळस हलला त्यात आपला काय फायदा? त्यामुळे आपल्याला आत्मा प्राप्त होईल का? म्हणजे हे तर ज्यांना देवावर श्रद्धा बसत नसेल, त्यांना श्रद्धा बसावी तेवढ्या पुरता ते हलवतात, म्हणजे ह्या लोकांची तिथे

श्रद्धा बसते! पण यात आपल्याला काय फायदा? ह्या संपूर्ण जगाला जरी हलवले, तरीही मी म्हणेन की तू कशासाठी डोकेफोड करतोस? उगाचच विना कारण! गप्प बस ना, झोपून जा गपचूप! यात आम्हाला काय फायदा? अज्ञान दूर झाले तर समजावे की फायदा झाला. बाकी, हे कपाट इथून तिथे सरकले त्यात आपला काय फायदा? म्हणून आपण एवढे म्हणावे की मला त्याचा काय फायदा?

**प्रश्नकर्ता :** मला असे वाटले होते की ती जागा पवित्र झाली!

**दादाश्री :** सर्व जग पवित्रच आहे ना! हे तर सारे विकल्प आहेत. आपल्याला तर आपले काम झाले तरच खरे. बाकी हे सर्व पोल (दिखावे) आहेत. अनंत जन्मांपासून सारखे हेच करत आलो आहोत ना! अमक्या ठिकाणी देव हालले, मूर्ति हालली. अरे, पण त्यात तुझा काय फायदा झाला? लोक तर म्हणतील, असे झाले आणि तसे झाले. पण आपण आपला फायदा पाहावा.

लोक मला सांगतात की, हा टीपॉय उड्या मारेल असे करा! तर ते शक्य आहे. त्यासाठी प्रयोग असतो. पण तसे केल्याने काय होणार? टीपॉय उड्या मारु लागला त्यामुळे काय होईल? मग तर इथे माणसे मावणार नाहीत, हा जिना तुटून जाईल आणि तुम्ही जे खरे ग्राहक आहात, तुम्हाला धक्का मारुन हाकलून देतील आणि दुसरे सगळे घुसतील. चमत्कार पाहण्यासाठी घुसतील. आपल्याला असे करण्याची काय गरज आहे? ही तर खऱ्या ग्राहकांची जागा आहे. खरा ग्राहक तोच की ज्याला मोक्षाला जायचे आहे, ज्याला भगवंताची ओळख करून घ्यायची आहे, साक्षात्कार करायचा आहे, त्यांच्यासाठी ही जागा आहे. हे अंतिम स्टेशन आहे! इथे असे-तसे सर्व नसते. इतर जागी लोकांना श्रद्धा बसावी याकरीता चमत्कार करतात. बाकी, ते तुमच्या सारख्यांसाठी नाही!

अरे, पुष्कळ माणसं तर एखाद्या झोपलेल्या माणसाचा हात वर करून देतात! तो तर झोपलेला आहे मग हात कसा वर झाला? हात वर झाला म्हणून काय तो जागा झाला? तो तर झोपलेला आहे. ही सर्व मशीनरी आहे! यात आपले काही काम होत नाही.

## कोणाचे दुखणे कोणी घेऊ शकतो?

**प्रश्नकर्ता :** एका संताने एका माणसाचे दुखणे स्वत: घेतले होते. ज्यामुळे नंतर संपूर्ण जीवन त्या संताने अपंग अवस्थेत काढले. त्याविषयी आपले काय मत आहे?

**दादाश्री :** कोणाचे दुखणे कोणी घेऊ शकत नाही, असे आम्ही मानतो. आणि त्यांची चूक होत असेल तर त्यांनाच नुकसान करेल ना? तुम्हाला काही नुकसान करणार नाही. म्हणजे असे कोणी करू शकत नाही. म्हणून ही शंका मनातून काढून टाका, असे सर्व!

आपल्या हिंदुस्तानचे संत आहेत, ते समोरच्याच्या शरीरामधून रोग सुद्धा स्वत:च्या अंगावर घेतात(!) असे पुस्तकात उघडपणे लिहिलेले असते. अरे, ह्या हिंदुस्तानचे बुद्धिवंत, तुम्हाला हेही समजत नाही की त्यांना शौचाला जाण्याची शक्ति नाही, मग तो ते कसे काय अंगावर घेणार होता? आणि ते तर निमित्त असतात. निमित्त म्हणजे काय, की कर्माचे उदय असे आहेत म्हणून त्यांच्या निमित्ताने परिवर्तन घडून येते. परंतु 'त्याचा रोग आम्ही घेऊन टाकतो, असे घेतो, असे त्याचे आयुष्य वाढवतो,' अशा ज्या सर्व गोष्टी करतात ना, ते डोक्यात किडे पडतील अशा गोष्टी करतात!!

**प्रश्नकर्ता :** ज्या संताच्या सांगण्याने समोरच्या व्यक्तिचे दुखणे निघून जाते, असे जे घडते त्याचे कारण म्हणजे त्या संताचे यशनाम कर्म असेल, असेच ना?

**दादाश्री :** असे सर्व होऊ शकते. त्या व्यक्तिचा रोगही बरा होतो. असे संताचे निमित्त असते. म्हणजे यशनाम कर्म असते. पण हे 'दुखणे अंगावर घेतात' हे जे सांगतात ना, ते खोटे आहे. तो जर असे सांगत असेल तर आपण विचारावे की, 'साहेब, मग तुम्हाला हे एवढे सारे रोग कशामुळे आहेत?' तेव्हा म्हणेल, 'दुसऱ्यांचे रोग अंगावर घेतले म्हणून!' पाहा, चांगला पुरावा सापडला ना! आता त्या संताला मी विचारेन की, 'अरे साहेब, तुम्हाला शौचाला जाण्याची शक्ति आहे का? असेल तर मला सांगा.' तुम्ही कसे काय दु:ख घेणार आहात? मोठे आले दु:ख घेणारे, शौचाला जाण्याची तर शक्ति नाही! अरे, माझ्या बाबतीतही लोक असे म्हणत होते ना! तीन

वर्षांपूर्वी ह्या पायाला फ्रॅक्चर झाले होते. तेव्हा अहमदाबादचे मोठे साहेब दर्शन करण्यास आले होते. मला म्हणाले की, 'दादा, हे तुम्ही कोणाचे दुखणे घेऊन आलात?' अरे, ही तुम्ही सुशिक्षित माणसे जर असे बोलाल तर बिचाऱ्या अडाणी लोकांची तर काय अवस्था? तुम्ही शिकले सवरलेले आहात, तुम्हाला स्वत: वर श्रद्धा आहे आणि तरी तुम्ही असे मानून घेता? या जगात कोणीही कोणाचे दु:ख किंचितमात्रही घेऊ शकत नाही. हो, त्याला सुख देऊ शकतो. त्याचे जे सुख आहे, त्यास तो हेल्प करतो, पण दु:ख घेऊ शकत नाही. हे तर मला माझे कर्म भोगायचे होते. प्रत्येकाला आपापले कर्म भोगावेच लागते. म्हणजे ह्या सर्व गोष्टी उत्पन्न केल्या गेल्या आहेत. हे तर लोकांना फसवून दम काढला आहे आणि ते पुन्हा आपल्या हिंदुस्तानातील शिकले सवरलेले लोकही खरे मानतात!! प्रतिकार करा ना, की 'घ्या, हे असे करून दाखवा.' पण असे विचारण्याचीही शक्ति नाही ना!! अशी ठोकमठोक चालवून घ्यायची नाही!!

## नाही वाढत आयुष्य क्षणभरही

**प्रश्नकर्ता :** मी तर इथपर्यंत ऐकले आहे की, आमचे जे आचार्य आहेत, त्यांनी एका वकीलाचे आयुष्य दहा वर्ष वाढवून दिले.

**दादाश्री :** आता असे बोलतात म्हणून तर ज्या लोकांना धर्मावर प्रेम आहे ना, तेही सोडून देतील सर्व. आणि असे सांगितले तर आपण विचारावे, 'अरे भाऊ, या वकीलालाच का दिले? दुसऱ्यांना का देत नाही? याचे कारण काय? सांगा बघू? आणि तुम्ही जर देणारे आहात तर दहा वर्षच का दिले? चाळीस वर्ष द्यायचे होते ना!' मी तर असे सर्व शंभर प्रश्न तयार करेन. काय सांगत होते? इथे दहा वर्षांचे आयुष्य वाढवून दिले?

**प्रश्नकर्ता :** असे मी ऐकले होते.

**दादाश्री :** ऐकलेले कदाचित खोटेही असते. असे दुसरे काही ऐकले आहे का? कोणत्याही मनुष्याची किंवा गुरुची निंदा करू नये. काय खोटे आहे आणि काय खरे आहे, याची गोष्टच करण्यासारखी नाही, तुम्ही सुद्धा हे सर्व खरे मानले होते? तुम्ही तर शिकलेले आहात, आता तरी तुम्हाला ह्या गोष्टींमधे शंका येईल की नाही?

**प्रश्नकर्ता :** शंका येईल.

**दादाश्री :** शंका वाटेल अशी गोष्ट सोडून द्या, खरे मानू नका त्यास!

## लिहिलेले लेख मिटत नाहीत कोणाकडूनही

**प्रश्नकर्ता :** संत लेख मिटवू शकतात का?

**दादाश्री :** हे फॉरेन डिपार्टमेन्ट आहे ना, त्यात लेख मिटेल असे शक्यच नाही आणि मिटवून टाकले असे जे दिसते, आपल्याला अनुभवास येते, संतांच्या माध्यमातून किंवा 'ज्ञानीपुरुषां'च्या माध्यमातून, ते त्यांच्या यशनाम कर्माचे फळ आले आहे! अर्थात् लेख कोणीही मिटवू शकत नाही. नाहीतर कृष्ण भगवंतांनी मिटवले नसते? त्यांना काय मिटवता येत नव्हते? ते तर स्वत: वासुदेव नारायण होते.

**प्रश्नकर्ता :** पण कित्येक संत असे पण सांगतात की त्यांनी मृत्युला दूर करण्याचा प्रयत्न केला!

**दादाश्री :** असे आहे ना, हिंदुस्तानात सर्व संतांनी मृत्युला दूर करण्याचे प्रयत्न केले आहेत. पण कोणालाही असे वाटले की मृत्यू दूर झाला, म्हणून? म्हणजे हा सर्व अहंकार आहे. अहंकाराच्या बाहेर कोणी संत निघाले नाहीत. हा सर्व अहंकार आहे. आणि अहंकारींना समजवण्यासाठी आहे. निर्‌अहंकारी तर अशा गोष्टी ऐकणारही नाही. एखादा वेडा मनुष्य बोलत असतो ना, यासारखी गोष्ट करतात हे!! आपले सारेच संत असे म्हणतात, पण ते अहंकाराने बोलतात आणि ऐकणारे सुद्धा अहंकारी आहेत, म्हणून जमले! हे तर सायन्टिफिक रित्या समजू शकेल असे आहे. विज्ञानाने समजेल की नाही समजणार? हे तर विज्ञान आहे आणि विज्ञान काय सांगते की शौचाला जाण्याचीही शक्ति कुणात नाही, संतामध्येही शौचाला जाण्याची शक्ति नाही आणि आमच्यातही शौचाला जाण्याची शक्ति स्वत:ची नाही. भगवान महावीरांचा जेव्हा अंतिम निर्वाणकाळ जवळ आला तेव्हा देवतांनी विनंती केली की, 'वीर, आपण आयुष्य वाढवा, प्रभु! दोन-तीन मिनिटांचे आयुष्य वाढवले तर या जगावर 'भस्मक' ग्रहाचा दुष्परिणाम होणार नाही.' पण 'भस्मक' ग्रहाचा दुष्परिणाम झाला, त्यामुळे हे दु:ख सहन करावे

लागले. दु:ख येऊ नये म्हणून देवतांनी भगवंतांना सांगितले होते. त्यावर भगवंत म्हणाले, 'तसे कधी घडले नाही, घडणारही नाही, आणि भस्मक ग्रह येणार आहे आणि तसे घडणारच आहे.' ही विज्ञानाची भाषा!! आणि या अहंकाराच्या भाषेत ज्याला जसे योग्य वाटेल तसे बोलतात ना! 'मी तुम्हाला वाचवले.' असेही म्हणतात. आपले सर्व संत असेच बोलतात. त्यामुळे त्या संतांनी अध्यात्म्यात एक पै सुद्धा कमवली नाही. अजूनपर्यंत आत्म्या सन्मुख गेले नाहीत. अजून तर तीन योगातच आहेत. मन-वचन-कायेच्या योगातच आहेत, आत्मयोगाकडे वळलेच नाहीत. आता याहून जास्त काही सांगितले तर वाईट दिसेल. मी असे बोलायला नको. म्हणजे ते लोक अजूनपर्यंत योगाच्या प्रक्रियेतच आहेत आणि मनाला, वाणीला, देहाला वश करीत आहेत. पण वश करणारा कोण? अहंकार!

अर्थात् आयुष्य कोणी वाढवू शकत नाही. जर कोणतीही व्यक्ति असे ओरडून सांगत असेल की, 'माझ्यात अशी शक्ति आहे.' तर आपण सांगावे की, शौचाला जाण्याचीही शक्ति नाही आणि उगाच असा का ओरडत राहतोस? तुझी अब्रू जाईल! विज्ञान स्वीकारत नाही. माझी ही गोष्ट समजतेय का? तुम्हाला काय वाटते?

**प्रश्नकर्ता :** समजत आहे.

**दादाश्री :** कारण की, माणसांना अशा गोष्टी खूप आवडतात. तसे तर मी सुद्धा बोलतो की तुम्हाला असे सर्व करून देईन आणि लोक सुद्धा सांगतात की, 'दादा, तुम्हीच हे सर्व करता.' 'अरे भाऊ, माझ्यात करण्याची शक्ति नाही. हे सर्व तर माझे यशनाम कर्म आहे. म्हणून ते तुमचे काम करीत आहे. आमच्याकडून एक शब्द सुद्धा चुकीचा बोलला जाऊ शकत नाही आणि यांचे तर काय? अहंकारी तर वाटेल तसे बोलेल. त्यांना कोण अडवणारा? तरी देखील आपण त्यांच्याविषयी बरे-वाईट बोलू नये. कारण त्यांच्या भक्तांसाठी ती गोष्ट खूप मोठे विटामिन आहे आणि त्यांच्या भक्तांची एकाग्रता होत आहे ना, त्यांचे चित एकाग्र होत आहे ना! म्हणून आपण दुसरे काही बोलू नये. दुसरे काही बोलायचे नाही. आपण त्यांच्या भक्तांचे चित्त विचलित करण्यासाठी हे सांगत नाही. हे

तर तुम्हाला समजावण्यासाठी आहे की, हे विज्ञान काय आहे! भगवान महावीरांनी तीन मिनिटे सुद्धा आयुष्य वाढवले नाही. अर्थात् असे काही घडत नाही!

**प्रश्नकर्ता :** आयुष्याचा, मनुष्याच्या श्वासाबरोबर काही संबंध आहे का?

**दादाश्री :** हो, संबंध आहे, हे बरोबर आहे.

**प्रश्नकर्ता :** यात हे योगी पुरुषांनी श्वासाला थांबवून, श्वासाची गती किंवा त्याचे प्रमाण कमी केले तर त्यांच्या आयुष्यात काही फरक पडतो का?

**दादाश्री :** हे बरोबर आहे. हे तर स्वाभाविकच आहे. हे आयुष्य वाढविणे याचा अर्थ काय, तर ते श्वासोच्छश्वास वापरु देत नाहीत, श्वासोच्छश्वासावर आयुष्य अवलंबून असते. पण ते त्यासाठी सांगत नाही, तो तर रुबाब दाखवितो. त्यासाठी सांगत असेल तर ठीक आहे! ते तर प्रत्येकाचे होते, त्यात नवीन काय आहे? जेवढे श्वासोच्छश्वास कमी वापरले जातात, तेवढे वर्ष वाढतात. पण हे तर काय म्हणतात? आयुष्य वाढवणे म्हणजे वर्ष वाढवणे–असे नाही, पण हे तर श्वासोच्छश्वास वाढवून दिले असा तोरा दाखवितात.

असे आहे, हे तर जगात सगळीकडेच श्वासोच्छश्वास कमी केले म्हणजे आयुष्य वाढते, हा तर नियमच आहे. त्यात ते असे बोलू शकत नाही की, आम्ही आयुष्य वाढविणारे आहोत. असे बोलणे हा तर मोठा अपराध आहे. भगवान महावीर सुद्धा असे बोलू शकत नाही, कोणीही बोलू शकत नाही! जिथे शौचाला जाण्याची शक्ति नाही तिथे आयुष्य कसे वाढविणार होते ते? जगात असा कोणीही जन्माला आला नाही की ज्याला शौचाला जाण्याची शक्ति असेल, याची गॅरन्टी लिहून देतो. आणि काही पण 'मी करत आहे' असे जे पुस्तकात लिहितात, ते सर्व अहंकारी आहेत. 'हे मी केले, मी असे केले आणि मी अमके केले' असे जे सांगतात ना, ते सर्व अहंकारी आहेत. आमच्या पुस्तकात 'मी करत आहे, तू करत आहेस आणि ते करत आहेत' असे कोणत्याही जागी नसते. दुसऱ्या सर्व

ठिकाणी तर असेच असते ना की, 'मी करत आहे', असे लिहीले असेल ते पुस्तक अहंकारींना सोपवून द्यावे. जर मोक्षाला जायचे असेल तर ते पुस्तक आपल्याजवळ ठेवू नये. 'मी असे करतो आणि मी तसे करतो, मी तारतो आणि मी बुडवतो.' ह्या सगळ्या अहंकाराच्या गोष्टी आहेत. बाकी कोणात काही करण्याची शक्तिच नाही ना! हे तर असे आहे की ही साधीभोळी प्रजा, म्हणून असे सर्व चालते!!

म्हणजे हे संत तर म्हणतील, 'मरणे आमच्या स्वाधीन आहे, आम्हाला जेव्हा मरायचे असेल तेव्हा आम्ही मरू', अरे, एक मिनिट सुद्धा अशी कोणाची ताकद नाही! हे तर मूर्ख लोकांना फसवत असतात! म्हणून मला असेच वाटेल ना की कुठपर्यंत तुम्ही असे मूर्ख बनून रहाल? भगवान महावीर सांगतात, 'हे देवता, असे कधी घडले नाही, घडत नाही आणि घडणारही नाही.' आणि हे लोक तर पाहा, लोकांची श्रद्धा बसावी म्हणून सांगतात. 'मी एवढे आयुष्य वाढवले!' पण मग थोड्या दिवसानंतर ही बसलेली श्रद्धा पण निघून जाते! सुशिक्षीत माणसाला यात शंका-कुशंका तर होणारच ना. मग ती खरी श्रद्धा म्हटली जाईल का?

## पण तिकिट चिकटतच नाही ना!

गुरु प्रत्यक्ष हजर असतील तरच काम होईल, नंतर कामास येत नाही. तरी देखील त्यांचे फॉलोअर्स (अनुयायी) पुस्तकात काय लिहितात? 'आमच्या गुरुंनी असे केले आणि तसे केले!' सर्व खोटे-खोटे चमत्कार लिहितात. ज्यास लहान मुले सुद्धा असे म्हणतील की हा वेडेपणा केला आहे, असे चमत्कार लिहितात! त्यास या काळातील मुले तर मानणारच नाहीत ना! पूर्वीच्या काळातील लोक चमत्कारास मानत होते.

**प्रश्नकर्ता :** पण दादा, हिंदुस्तानात तर सर्वच लोक चमत्काराला मानतात ना! मग तो कोणीही असो, बॅरिस्टर, डॉक्टर, इंजिनियर सर्वच मानतात.

**दादाश्री :** ते सर्व लालची आहेत म्हणूनच मानतात. नाहीतर चमत्कारासारखी गोष्ट ह्या जगात नसतेच. आणि जो काही चमत्कार

आहे, ते आवरणाने झाकलेले विज्ञान आहे. बाकी, चमत्कारासारखी गोष्ट नाहीच.

**प्रश्नकर्ता :** पण हे जे चमत्कार करतात ना, त्यांना तर लोक 'हे ज्ञानीपुरुष आहेत' असे म्हणतात.

**दादाश्री :** ते तसेच म्हणतील ना, आणि असे जर नाही म्हटले तर त्यांचे चमत्कार चालणार नाहीत. त्यांना जर विचारले, त्यांचे निवेदन घेण्यात आले, की हा चमत्कार कशासाठी करत आहात? कोणत्या हेतुसाठी करत आहात? त्याचे तुम्ही निवेदन करा, असे म्हणावे. मग मजा येईल!

**प्रश्नकर्ता :** तेव्हा ते लोक असे म्हणतात की श्रद्धा उत्पन्न करण्यासाठी.

**दादाश्री :** जर त्याच्यावर श्रद्धा बसतच नसेल, तर असे खोटे करून श्रद्धा उत्पन्न करवणे हा गुन्हा आहे. अशा प्रकारे जो मनुष्य श्रद्धा उत्पन्न करतो, त्याला पकडून शिक्षा केली पाहिजे.

मी पंचवीस वर्षाचा होतो, तेव्हा एका संत आचार्यांकडे गेलो होतो. ते मला म्हणाले, 'माझ्यावर श्रद्धा ठेवा.' मी म्हणालो, 'पण मला श्रद्धा बसत नाही.' तेव्हा म्हणाले, 'पण तुम्ही श्रद्धा बसवण्याचा प्रयत्न करीत राहा.' तेव्हा मी म्हणालो, 'मी तुम्हाला उदाहरण देतो. हे तिकिट आहे, त्यास आपण पाणी चोपडून चिकटविले, पण ते पडून जाते. चिकटत नाही तेव्हा आपल्याला हे नाही का समजणार की काहीतरी कमी पडत आहे या दोघांमध्ये? ज्याच्यावर आपल्याला तिकिट चिकटवायचे आहे ते, आणि हे तिकिट, या दोघांच्यामध्ये कुठली तरी वस्तू कमी पडत आहे, असे आपल्या लक्षात येते की नाही येत? कोणती वस्तू कमी पडत आहे?

**प्रश्नकर्ता :** डींक कमी पडत आहे.

**दादाश्री :** हो. म्हणून मी म्हटले, की 'असा काही डींक(गोंद) लावा की माझे तिकिट चिकटेल'. तरीही ते म्हणाले, असे नाही 'तुम्हाला माझ्यावर श्रद्धा ठेवावी लागेल.' मी म्हणालो, 'नाही, अशी श्रद्धा मी ठेवणार नाही. मला श्रद्धा बसतच नाही! जर तुम्ही तसे 'देखणे' असते तर

देखण्याच्या आधारावर मी थोडी श्रद्धा ठेवली असती. तुम्ही असे देखणे नाहीत. जर तुम्ही अशी वाणी बोलणारे असते की तुमची वाणी ऐकून मी खुष झालो असतो, तरीही माझी श्रद्धा बसली असती, किंवा मग तुमचे वर्तन पाहून माझी श्रद्धा बसली असती. पण मला तुमच्यात असे काहीच दिसत नाही. पण तरी मी असे सहज दर्शन करण्यास येईन, तुम्ही त्यागी पुरुष आहात म्हणून. बाकी, मला तुमच्यावर श्रद्धा बसतच नाही!'

आता तिथे जर ते चमत्कारीक गोष्ट करायला गेले तर मी जास्त रागवेन, की अशी जादुगिरी कशासाठी करीत आहात? पण हिंदुस्तानचे लोक लालची, म्हणून जिथून चमत्कार पाहून येतात तिथे त्यांची श्रद्धा बसते. त्या चमत्कार करणाऱ्यास आपण सांगावे, 'हिंदुस्तानाच्या लोकांना अन्न-धान्य कमी पडते, तुम्ही अन्न-धान्य गोळा करा. हा चमत्कार करा, तुमच्यात जी शक्ति आहे, ती यात वापरा. पण असे काही ते करत नाहीत! हे तर मूर्ख बनवितात लोकांना!

**प्रश्नकर्ता :** आतापर्यंत असे मूर्ख बनतच आलो आहोत.

**दादाश्री :** पण मग असे जीवन कुठपर्यंत जगावे? लालूच का असावी? माणसाला कशासाठी लालूच असावी? आणि परत तो देणारा कोण? ज्यात शौचाला जाण्याचीही शक्ति नाही, तो काय देणार?

## फसले विचारवंत सुद्धा...

आणि मी चमत्कार केला असे कोण बोलतो? तर ज्याला काहीतरी लाभ उठवायचा आहे, तोच असे बोलतो. आणि कुणाकडून लाभ घ्यायचा आहे? जे लोक तुमच्याजवळ काही मागत आहेत, त्यांचाच तुम्ही लाभ उठवता? जे लोक स्वत:चे दु:ख दूर करण्यासाठी सुख मागायला आले आहेत, त्यांचाच लाभ उठवता? जे सुखाचे भिकारी आहेत, त्यांच्याकडून तुम्ही सुख घेता? कसे आहात तुम्ही? त्यांच्याकडून तुम्ही एक पै देखील कसे घेऊ शकता? म्हणजे ते तुमच्याजवळ भिकारी आहेत आणि तुम्ही त्यांच्यासमोर भिकारी आहात! तुमचाही भिकारीपणा सुटत नाही!! मग आत ज्ञान कसे प्रकट होईल? ज्ञान प्रकट होणारच नाही ना! ज्ञान तर, जिथे

कुणाचे किंचितमात्रही सुख हिरावून घेण्याची ज्याची इच्छा नाही, तिथे ज्ञान प्रकट होते. कोणत्याही प्रकारची भीक नाही, मान-तानाची भीक नाही, अपमान केला तरीही हरकत नाही, मान दिला तरी हरकत नाही, विषय-विकार संबंधी भीक नाही, तिथे ज्ञान प्रकट होते. आणि हे लोक म्हणतात, 'आम्ही ज्ञान घेऊन फिरत' आहोत. पण तुझ्यात तर सर्व प्रकारची भीक आहे मग तिथे ज्ञान कसे असेल ?! आणि हे असे तर ह्या दिशाभूल झालेल्या प्रवाहात चालेल. या इथे बुद्धिवंतांजवळ असे नसावे !

पण आपल्या इथे बुद्धिवंत कसे आहेत ? कच्चे आहेत, तुमच्या सारखे नाहीत. 'असो, आपल्याला त्याचे काय ?'असे बोलतात ते. म्हणून तर त्या लोकांना बुद्धिवंत लोकांचे रक्षण मिळाले. परंतु जर बुद्धिवंतांनी त्यांचे रक्षण केले नाही, तर ते लगेच सरळ होतील. हिंदुस्तानातील लोक, 'आपल्याला काय ?' असेच बोलतात ! मला तर 'आपल्याला काय ?' हे चालतच नाही, सहन होत नाही. स्पष्टपणे सांगा ना, दोन जन्म जास्त झाले तरी चालेल ! पण आपले बुद्धिवंत लोक सुद्धा चमत्काराला मानू लागले. अरेरे ! असे का झालेत लोक ! चांगल्या विचारवंत माणसांमध्ये सुद्धा असे ठाम बसले आहे की या चमत्कारासारखे काहीतरी नक्कीच आहे. हा जो दिशाभूल झालेला प्रवाह त्याला मानतो, त्यावर विश्वास ठेवतो, त्याची आपल्याला हरकत नाही, पण विचारवंत माणसं देखील त्यास मानतात, म्हणून असे समजावे की आपल्या हिंदुस्तानाची जी बुद्धिशक्ति आहे, ती फ्रॅक्चर होऊ लागली आहे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे लोकांच्या भाषेत त्यास चमत्कार म्हटला जातो ?

**दादाश्री :** ते दिशाभूल झालेल्या प्रवाहात, बुद्धिवंतांच्या भाषेत नाही. आणि बुद्धिवंत माझ्याकडे येत असत, ते सांगत होते की, 'हा चमत्कार !' तेव्हा मी सांगितले, 'तुमच्यासारखे बुद्धिवंत लोक असे मानतात ?' तेव्हा ते म्हणाले, 'आम्हाला मनात तर खूप काही होत असते पण आमच्या डोक्यात हे सतत घातल्याने मग आम्हालाही ते खरेच वाटते. नंतर मी त्यांना सगळ्या तऱ्हेने समजावले, म्हणून त्यांना एक्सेप्ट झाले. नंतर म्हणाले, 'आता आम्ही

मानणार नाही.' आणि ते समजून गेले की चमत्कारासारखे काही नसते. मनुष्य चमत्कार करू शकत नाही.

चमत्कारासारख्या गोष्टींना बुद्धिवंतांनी मानू नये. आणि आपले ज्ञान घेतलेल्या महात्म्यांनी तर हे मानूच नये. कोणी चमत्कारी असेल तर त्याला म्हणावे की, 'तू चमत्कारी असला तरी मला त्याचे काय ?

म्हणजे यात बुद्धिमान माणसे अडकत नाहीत. दुसरे सगळे तर समजा अडकणारच आहेत. ते तर चार मेंढ्या पुढे चालतील ना, त्यांना पाहून, त्यांचे पाय बघूनच चालतील, तोंड पाहणार नाही. त्याचे पाय कोणत्या बाजूने वळतात त्या बाजूने चालत राहतील. रेघही ओढावी लागणार नाही ! सगळे बसून राहतील तेव्हा तोही बसून राहील. सगळे हरे म्हणतील, तेव्हा तोही हरे म्हणेल. कोणी विचारले, तुम्हाला काय समजले ? तर तो म्हणेल, 'समजेल कधीतरी !'

## चमत्कार बुद्धिजन्य आहे, ज्ञानात नाही

प्रश्नकर्ता : पण ते लोक तर जगात असेच सांगतात की, हे 'मिरॅकल' (चमत्कार) झाले. जी घटना नेहमी घडत नाही अशी घटना घडली त्यास मिरॅकल म्हणतात, चमत्कार म्हणतात.

**दादाश्री :** असे तर फॉरेनवाले म्हणतात, आपण थोडेच असे म्हणू शकतो ?

**प्रश्नकर्ता :** हे तर जे तुमच्याकडे आलेत ते समजतील. बाकी तर हजारामधून नऊशे नव्याण्णव लोकांची भाषा तर तीच ना ?

**दादाश्री :** हो तीच भाषा. म्हणूनच म्हणतो ना, आपल्या लोकांना तर खरा आहे की खोटा आहे, त्याची तमा नाही. चमत्कार दाखवला की मग वठणीवर राहतो, अन्यथा राहत नाही. पण मी तर कोणी चमत्कार दाखवला तर समजून जातो की ह्या लोकांनी फसवणूक केली. चमत्कार घडूच कसा शकतो ? हे कसे पॉसिबल (शक्य) आहे ? विज्ञान मान्य करेल तरच चमत्कार पॉसिबल आहे ! चमत्कार ही बुद्धिगम्य वस्तू नाही आणि

ज्ञानात तर चमत्कार नसतातच. बुद्धिगम्यमध्ये जे चमत्कार असतात, ते तर कमी बुद्धिवाल्याला जास्त बुद्धिवाला फसवतो. तात्पर्य हेच की चमत्कार नसतात!

**प्रश्नकर्ता :** म्हणजे दादा, ही काहीतरी बुद्धिपलीकडील वस्तू आहे. तो जरी चमत्कार नसेल, पण बुद्धिच्याही पलीकडील असे काहीतरी आहे ?

**दादाश्री :** नाही, तेही नाही. हे चमत्कार करतात, ती बुद्धिच्या पलीकडील वस्तू सुद्धा नाही. बुद्धिच्याही पलीकडील अशी फक्त एकच वस्तू आहे, आणि ते 'ज्ञान' आहे. ते तर स्व-पर प्रकाशक ज्ञान आहे आणि ज्ञानात चमत्कार नसतो. जर चमत्कार म्हटले, तर ते बुद्धित गणले जाईल. पण बुद्धित सुद्धा त्यास चमत्कार म्हटले जाणार नाही.

## हा तर खुदाई चमत्कार!!

ज्ञानात चमत्कार नसतो. मी तर ज्ञानीपुरुष आहे पण आत स्वत: खुदा (भगवंत) प्रकट झालेले आहेत. ते खुदाई चमत्कार दाखवतील की नाही, थोडाफार तरी? खुदाई चमत्कार म्हणजे काय की त्याला शिव्या द्यायच्या असतील तरीही त्याच्याकडून दिल्या जाणार नाहीत. इथे गळ्यापर्यंत शब्द येतात, पण बोलू शकत नाही. असे घडते की नाही? एक मनुष्य इथे आला होता, तो घरुन ठाम ठरवून आला होता की आज तर जाऊन दादांना बोलेनच. तो मला शिव्या देण्यास आला होता. पण इथे येऊन बसला ना, की मग त्याच्या गळ्यातून शब्द निघूच शकले नाहीत. हा कोणता चमत्कार म्हटला जाईल? खुदाई चमत्कार! असे कितीतरी खुदाई चमत्कार 'ज्ञानीपुरुषां'जवळ असतात, ज्याला चमत्कार करायचा नाही तिथे खूप चमत्कार घडत असतात. पण तरी देखील आम्ही त्यास चमत्कार म्हणत नाही.

**प्रश्नकर्ता :** तरी पण जे अनुभव चमत्कार रूपाने स्वप्नात होत असतात, त्यास काय म्हटले जाईल? माझ्या भयंकर आजारपणात दादांनी स्वप्नात येऊन मला हार घालून विधी केली. आणि दुसऱ्याच दिवशी सकाळी चमत्कारिक रितीने माझे दुखणे, आजार सर्व निघून गेले आणि नॉर्मल होऊन गेलो. हा अनुभव सत्य असतो का?

**दादाश्री :** हा चमत्कार नाही, वास्तविकता आहे. जसे मी प्रत्यक्ष भेटलो असेल, त्याचसारखे हे सूक्ष्म स्वरुपात भेटलो. ही वास्तविकता आहे, यात कोणताही चमत्कार नाही.

**प्रश्नकर्ता :** पण दादा, असे घडले तर सर्वांना चमत्कार वाटणार की नाही ?

**दादाश्री :** असे तर हजारो ठिकाणी घडत असते. आणि मी जर यास चमत्कार म्हटले तर लोक मला बुवा बनवून टाकतील की तुम्ही तर चमत्कारी बुवा आहात. पण मी बुवा नाही.

कित्येकांना 'दादा' स्वप्नात येतात, गप्पागोष्टी करतात. आता हे काही माझे सांगितलेले नाही. 'धीस इज बट नॅचरल' ज्याची जशी चित्तवृत्ती असेल, कोणी भगवंताला शोधत असेल, तर त्याला तसे सर्व दर्शन होते ! मुसलमानांच्याही स्वप्नात येतात, पण मला ते माहितही नसते.

**प्रश्नकर्ता :** दादा असे सांगत नाहीत की मी चमत्कार करतो, पण असे चमत्कार होतच असतात ना ?

**दादाश्री :** हो, होतात ना. जग तर यास चमत्कार म्हणते. पण आपण जर यास चमत्कार म्हटले तर जग जास्त वेडेपणा करेल. हा 'चमत्कार' शब्दच उडवून टाका ! यासाठीच मी हे शोधून काढले की शौचाला जाण्याची तर शक्ति नाही आणि हे काय चमत्कार करणार आहेत ? असे म्हटले तर चमत्कार नावाचे जे भूत लोकांमध्ये घर करून बसले आहे, ते लोक त्यातून बाहेर निघतील !

**प्रश्नकर्ता :** मग यांना जो अनुभव झाला ते काय आहे ?

**दादाश्री :** मी सांगितले होते ना की तुमची तयारी पाहिजे. इथे सगळीच तयारी करून ठेवली आहे. जेवढी तुमची 'हार्टची प्योरिटी', जसे तुम्ही बटण दाबाल तेवढे तयार ! म्हणजे फक्त तुम्ही बटण दाबण्याचीच खोटी आहे. बाकी, जग तर यास चमत्कारच म्हणेल. आम्ही हेच सांगू इच्छितो की, यास जर चमत्कार ठरवले तर जगाला हेच हवे आहे. आपल्याकडून, आपली सहमती मागतात की चमत्कार होत असतो की

नाही! जग आपली सही मागत असते की चमत्कार ही खरी गोष्ट आहे की खोटी? चमत्कार खोटी गोष्ट आहे.

**प्रश्नकर्ता :** पण असे घडत असते, दादा!

**दादाश्री :** असे सर्व खूप ठिकाणी होत असते. म्हणून त्यांना समजावतो की, 'हो, मी आलो होतो.' कारण सूक्ष्म शरीर फिरत असते, हे मी पाहू शकतो. अमेरिकेत सुद्धा जाते. मी अमेरिकेत होतो तेव्हा या इथे अहमदाबादचे संघपती रमेशभाऊ यांची पहाटे येऊन विधी केली होती, अमेरिकेला त्यांचे पत्र आले होते की 'तुम्ही येऊन माझी विधी केली, माझे तर कल्याण झाले!' अशी तर पुष्कळ लोकांची आपल्या इथे पत्रे येतात. असे वारंवार होतच असते. पण आपण जर यास चमत्कार म्हटले तर यामुळे गैरसमज जास्त पसरेल. मग ते दुर्बल लोक याचा जास्त लाभ उठवतील. म्हणून आपणच चमत्काराला उडवून टाका ना, इथूनच! ज्याला मोबदला पाहिजे असेल तो बोलेल, मान्य करेल की हो भाऊ, चमत्कार आहे माझा( !) आपल्याला तर काही मोबदला नकोच असतो! म्हणून हे उडवून टाका. हा चमत्कार नाही.

## हे तर आमचे यशनाम कर्म

आता यास चमत्कार म्हटला जात असेल तर असे आपल्या इथे दररोज शंभर-शंभर, दोनशे-दोनशे चमत्कार घडत असतात. पूर्वीच्या संतानी दहा चमत्कार केले असतील, तर लोक त्याचे मोठे मोठे पुस्तक रचून दिखावे करतात. इथे तर असे रोजचे दोनशे-दोनशे चमत्कार घडत असतात!

कोणी म्हणतो, 'घरी माझ्या भावाला खूप ताप येत आहे, आज पंधरा-वीस दिवस झाले तरीही ताप उतरत नाही.' मग माझा एक हार त्याला देतो, तर दुसऱ्याच दिवशी पत्र येते की ताप पूर्णपणे गेला आहे. हार घातल्याबरोबरच ताप उतरला. असे सर्व कितीतरी केसेस होत असतात. हे तर आमचे 'यशनाम' कर्म आहे. आणि जे चमत्कार करतात त्या संतांचेही यशनाम कर्म असते.

पूर्वी आपल्या इथे फुलांचे हार घालत होते. तेव्हा पाच-पंचवीस हार येथे असायचे, तर एखादा माणूस इथून हार घेऊन जायचा आणि मग हॉस्पिटलमध्ये जाऊन तेथील आजारी माणसांना ते हार घालत असे आणि त्यांना सांगायचा की, 'दादा भगवानांचा असीम जय जयकार हो' असे बोला. तर सकाळी डॉक्टर म्हणत असत की 'ह्या रुगणांमध्ये एवढा फरक कसा काय पडला?'

**प्रश्नकर्ता :** तरी सुद्धा ते चमत्कार नाही, असे आपण सांगता?

**दादाश्री :** हो, चमत्कार केला असे आपण म्हणत नाही आणि हे जे ऐकले ना, याहीपेक्षा खूप मोठे घडले आहे, हे जग फीदा होऊन जाईल असे घडले आहे, पण त्यास जर चमत्कार म्हणाल तर दुसऱ्यांचे चमत्कार चालूच राहतील. म्हणूनच मी हे चमत्कार तोडण्यासाठी आलो आहे. खरेतर, वास्तवात हे चमत्कार नाहीतच.

हा आमचा फोटो सुद्धा खूप काम करतो. म्हणून शेवटी मग लोकांना आम्ही फोटो देत असतो. कारण जर इतके काम केले नाही तर ही 'भांडी' स्वच्छ होतील असे नाही. 'भांडी' इतकी घाण झाली आहेत की ती घासून स्वच्छ करता येणार नाहीत. म्हणून निसर्ग काम करून राहिला आहे. सर्व होत राहिले आहे, चमत्कार नाही हा! या सारखी तर दररोज कित्येक पत्रे येतात की, 'दादा, त्या दिवशी तुम्ही सांगितले होते की जा, तुला नोकरी मिळेल, तर मला नोकरी लागली! हे सर्व निसर्ग करीत आहे!

मला खूप लोक सांगायला येतात की, 'दादा, तुम्हीच हे सारे केले. हे चमत्कार तुम्हीच केले.' तेव्हा मी म्हणालो, 'भाऊ, मी काही चमत्कारी नाही. मी काही जादुगार नाही आणि मी असे काही करू शकेन असा नाही.' तेव्हा म्हणतात की, मग 'हे कोणी केले?' असे आहे ना की, दादा स्वत:चे यशनाम कर्म घेऊन आले आहेत, म्हणून दादांचे यशगान बोलले जाते. आणि ते यशनाम कर्म तुमचे भले करते. तुमचे निमित्त असते त्यात, त्यात माझे काय? मी त्यात कर्ता नाही ना? म्हणून मी कशाला असा माल खाऊ?! हे लोक तर विनाकारण यश देण्यास येतात. आणि ते यश खाणारे सर्व यश खात राहतात. लोक तर यशाचे भुकेले असतात, म्हणून मग खात

राहतात. हे संतपुरुष सुद्धा खातात पण ते त्यांना पचत नाही बिचाऱ्यांना, उलट जास्त भटकतात! प्रत्येकाचे आपापले यशनाम कर्म असते म्हणून त्यांना यश मिळते. जो थोडा जरी संत झाला असेल, त्याचे थोडेसे यशनाम कर्म असते आणि आमचे यशनाम कर्म मोठे! मला तर संसारी अवस्थेतही यश मिळत होते. असाच, सहजच जरी हाताने स्पर्श केला ना, तरी त्याच्या घरी पैशांचा ढीग होत असे, पण माझ्याच घरी मात्र पैसे येत नसत! आणि मला त्या पैश्यांची गरजही नाही. जेव्हा गरज होती तेव्हा आले नाही आणि आता गरज नाही तेव्हा येण्यास तयार आहे. तेव्हा मी म्हणालो, 'जा, हीराबांकडे, (हीराबा-दादाश्रींची पत्नी) आम्हाला आता काय गरज?'

म्हणजे हे मी केले नाही. हे तर आमचे जे यशनाम कर्म आहे, ते नामकर्मच तुम्हाला सर्व फळ देत आहे. आणि लोकांनी त्यास चमत्कार मानावा, असे शिकवले गेले! चमत्कार तर होऊच शकत नाही. मी एका बाजूनी असेही सांगतो की वर्ल्डमध्ये कुणालाही शौचाला जाण्याचीही शक्ति नाही, तर मग चमत्कार कसे करू शकतील?

नंतर पुष्कळ माणसे येऊन सांगतात की, 'दादाजी, मी असा फसलो आहे, तर आपण मला यातून सोडवा ना. म्हणून मी विधी करतो, त्यानंतर त्यांची सुटका होते. म्हणून काय ते मी केले? नाही. मी त्यात निमित्त होतो. हे यशनाम कर्म होते माझे!

एका माणसाने माझ्यासोबत करोडो रुपयांचा सौदा केला. म्हणाला, माझी करोड रुपयांची संपत्ती सर्व फसली आहे आणि आज तर माझ्याजवळ मेन्टेनन्स(जीवननिर्वाह) करण्याइतकेही पैसे नाहीत.' तेव्हा सगळे म्हणाले याला काही विधी करून द्या ना, बिचाऱ्याची काही संपत्ती विकली जाईल. त्याला संपत्ती तीन-तीन वर्षांपासून विकायची होती, पण ती विकली जात नव्हती. म्हणून विधी करून दिली. नंतर महिन्याच्या आत सत्तर लाखांची संपत्ती विकली गेली. मी सांगितले, 'ह्या फॅक्टरीत सत्यनारायणाची पूजा घाला आणि त्या फॅक्टरीत जैनांची पूजा करा.' नंतर तो मला म्हणाला, 'दादाजी तीस लाखांची मिळकत बाकी आहे, काही करा ना!' तेव्हा मी समजून गेलो की ह्या माणसासोबत चुकीचा व्यवहार झाला आहे. या

माणसाने देवाचे उपकार मानले तरी पुष्कळ आहे. तुझ्याकडून मला काहीही नको. तू जर देवाचे उपकार मानले की, ओहो! देवाच्या प्रतापाने मी सुटलो, इतके जरी केले तरीही खूप झाले. आणि हे जर मी करीत असेन तर मी दलाली नाही का घेणार? मग तर मी असेच म्हटले असते ना की तुझे काम सफल झाल्यावर इतके टक्के दलालीचे द्यावे लागतील. म्हणून आम्ही तो व्यापारच बंद केला. काम करण्याचे, आणि नाही करण्याचे दोन्हीही बंद करून टाकले ना!

**प्रश्नकर्ता :** आत्म्याची गोष्ट तर चालूच आहे ना!

**दादाश्री :** यात आत्म्याच्या गोष्टींचा काही संबंध नाही. ह्या गोष्टीत मोबदला नसतोच. याचा मोबदला नसतो, याचा जर मोबदला द्यावा लागत असेल तर ही गोष्ट फळणारच नाही.

**प्रश्नकर्ता :** या ज्ञानात तर काही घेण्याचे नसते, यात तर देण्याचीच गोष्ट आहे ना?

**दादाश्री :** हो. बस. कारण की यात तुम्ही बदल्यात काय देणार? पुद्‌गल द्याल. आणखी काय द्याल? आणि याची किंमत जर पुद्‌गल असेल तर मग तो आत्माच नाही. अमूल्य वस्तुची वेल्यू नसते!

## मलाच चूर्ण घ्यावे लागते तर....

इथे एक भाऊ येत असतात. त्यांचे वडील ७८ वर्षांचे होते. ते आमच्या गावचे होते. मी त्यांच्या घरी त्यांना दर्शन देण्यास जात होतो. त्यांनी स्वत:च्या वडिलांना सांगितले की, 'आज दादा दर्शन देण्यासाठी येणार आहेत.' ७८ वर्षाच्या माणसाला इथे कसे आणू शकतो? पण त्यांनी काय केले? घराबाहेर निघून रस्त्यावर येऊन बसले. मग मी तिथे गेलो तेव्हा मी त्यांना विचारले की, 'तुम्ही असे रस्त्यावर बसता, हे काही बरे दिसते का? यात काय फायदा? ते सांगा. तेव्हा ते म्हणाले, इथे खाली येऊन बसलो तर दोन मिनिटे लवकर दर्शन होतील! आणि घरात तर तुम्ही याल तेव्हा दर्शन होतील! पण मी म्हणालो, खाली तर धूळ.... ? तेव्हा म्हणाले, 'असू दे धूळ, अनंत जन्म धुळीतच गेले ना आमचे! आता या जन्मात तुम्ही

भेटले आहात तर या भटकंतीचा अंत येऊ द्या ना!' तेव्हा मी म्हणालो, 'ठीक आहे मग!' मी हसलो. त्यांनी तर दर्शन करताना माझे पाय गच्च धरुन ठेवले. मी पाठीवर असे केले, धन्य आहे, असे सांगण्यासाठी त्यांची पाठ थोपटली. तर बारा वर्षांपासून त्यांच्या कमरेत जबरदस्त दुखणे होते, ते लगेच दुसऱ्याच दिवशी स्टॉप!

म्हणून मग त्यांनी काय केले? गावभर फिरुन सांगून आले की, 'गेल्या बारा वर्षांपासून माझे जे दुखणे होते, पुष्कळ औषधोपचार केले तरीही दुखणे बरे होत नव्हते पण दादाजींनी एकदाच पाठ थोपटली नी लगेच ते बरे झाले.' मग तर गावात अशी दहा-वीस माणसे होती, की जी दु:खाने कंटाळलेली होती, ती सगळी माझ्याकडे आली! मला म्हणाली, 'आपण त्यांना जे काही केले, तसे आम्हालाही काही करा. तेव्हा मग मी त्या सगळ्यांना समजावले की जेव्हा मला संडास होत नाही तेव्हा मलाच चूर्ण घ्यावे लागते. कधी बद्धकोष्ठता होते तेव्हा मला चूर्ण घ्यावे लागते. त्यावरुन तुम्ही जरा समजा ना! माझ्याने काही होऊ शकेल असे नाहीच, हे सर्व! हे तर वारा सुटला आणि कौल सरकले आणि ते पाहून कुत्रा भुंकला, कोणी म्हणाले मी पाहिला चोर, आणि तिथे झाला शोर!' याचे नाव संसार. हे सायन्टिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स आहे, हा चमत्कार नाही.

लगेच हे माझ्या लक्षात आले. म्हणून मी स्पष्टच सांगितले की चूर्ण घेतो तेव्हा मला संडास होते. मला वाटले की आता काहीतरी मार्ग शोधून काढा, नाहीतर ही रोजचीच झंझट सुरु होईल. कोणता व्यापार होता आणि कोणता व्यापार सुरु होईल!

**प्रश्नकर्ता :** ह्या गोष्टींमध्ये मग आत्म्याचा विसर पडतो ना?

**दादाश्री :** हो, आत्म्यास विसरुन जातील आणि हे दुसरे लोक तर आपल्या माणसांना इथे येऊच देणार नाही ना! ते लोकच सर्व इथे येऊन बसतील आणि हे मिलमालक तर मला इथून उचलून नेतील. हे पैसेवाले लोक तोडफोड सुद्धा करतील, वाटेल ते करतील. माझ्या आसपासच्या माणसांचे ऐकणारही नाहीत आणि कसेही करून मला इथून उठवतील.

एक माणूस तर मला सांगत होता, 'दादा, आपले अपहरण करून घेऊन जाऊ.' मी म्हणालो, 'हो, या जगाचे काही खरे नाही.'

## आम्ही जादुगार नाही

म्हणजे आपल्या इथे असे रोजचे कितीतरी चमत्कार होतात, पण मी सगळ्यांना सांगत असतो की, दादा चमत्कार करीत नाहीत. दादा जादुगार नाहीत. हे तर आमचे 'यशनाम' कर्म आहे. एवढे सारे यश आहे की फक्त हात लावला आणि तुमचे काम फत्ते होऊन जाते. आपल्या इथे एक ज्ञान घेतलेले महात्मा आहेत. त्यांची सासू कॅन्सरच्या टाटा हॉस्पिटलमध्ये होती. तर त्यांच्या सासूबाईंना हॉस्पिटलवाल्यांनी रजा दिली की आता दोन-तीन दिवसात ही केस 'फेल' होणार आहे, तर यांना तुम्ही घरी घेऊन जा. तेव्हा त्या महात्म्याच्या मनात आले की, 'दादा इथे मुंबईतच आहेत, तर माझ्या सासूला दादांचे दर्शन करवून देतो. मगच इथून जाऊ.' म्हणून मला येऊन सांगू लागले की, 'माझ्या सासूबाई आहेत ना, त्यांना जर दर्शन दिले तर खूप बरे होईल.' मी म्हणालो, 'चला, मी येतो.' मग मी टाटा हॉस्पिटलमध्ये गेलो. त्याने सासूला सांगितले, 'दादा भगवान आले.' म्हणून ती बाई तर उठून बसली. कुणालाही अशी आशा नव्हती, पण ती बाई त्यानंतर चार वर्ष जगली. त्या डॉक्टरांनी सुद्धा त्याची दखल घेतली की हे दादा भगवान येथे आले आणि कुणास ठाऊक त्यांनी काय केले! पण मी काही केले नाही फक्त पायावर विधी करवून घेतली होती! असेच बडोद्याच्या मोठ्या हॉस्पिटलवाल्यांनीही नोंद घेतली होती की 'दादा भगवान' यांच्यामुळे एवढ्या रुग्णांमध्ये फेरफार झालेला आहे.

नंतर तीन जणांनी तर आम्हाला अशी बातमी दिली होती की अचानक तोल गेल्यामुळे विमान हलू लागले तेव्हा लगेचच आम्ही 'दादा भगवानांचा असीम जय जयकार हो' बोलू लागलो, आत लोकांमध्ये तर आरडाओरड सुरु झाली होती, पण आम्ही 'दादा भगवानांचा असीम जय जयकार हो' बोललो की लगेच प्लेन व्यवस्थित झाले!!

## इथे संसार मुक्त, युक्त नाही

असे आमचे कितीतरी चमत्कार होत असतात, तरीही आम्ही त्यास

चमत्कार म्हणत नाही. लोक मला येऊन सांगतात की, 'दादा, हा तुम्ही चमत्कार केला. मला असा लाभ झाला.' मी म्हणालो, 'हा चमत्कार नव्हे.' बाकी आपल्या इथे तर थोडे-फार नाही पण अपार चमत्कार होत असतात. पण ते काय आहे ? तर हे माझे यशनाम कर्म आहे. म्हणजे फक्त माझा हात लागला की तुमचे कल्याण होते आणि त्याचे यश तुम्ही मला देता की हे सर्व दादाजींनी केले. पण त्यात माझे काय ? हे तर यशनामकर्माने केले आहे ! कोणी केले ?

**प्रश्नकर्ता :** पण तरी देखील दादांनी केले असे तर म्हटले जाईल ना ?

**दादाश्री :** नाही, दादांनी नाही, जे यशनाम कर्म आहे ना, ते कर्म असते. कर्म वेगळे आणि आपण वेगळे. ते कर्म आपल्याला फळ देते. ते यशनाम कर्म खूप मोठे असते म्हणून आम्हाला सगळे जण यशच देत राहतात.

तुम्हाला याची खात्री आहे का, की जैन शास्त्रकारांनी नामकर्मात यशनामकर्म आणि अपयशनामकर्म लिहीले आहे ? कित्येक माणसे अशी असतात की काम केले तरी त्यांना अपयश मिळते, असे तुमच्या ऐकण्यात आले आहे ? त्याचे कारण काय ? तर ज्याचे अपयशनामकर्म असते, त्याला अपयशाचे फळ मिळते. त्याने चांगले काम केले तरीही त्याला नेहमी अपयशाचेच फळ मिळते. म्हणजे त्याने अपयश बांधले आहे, आणि मी करत नाही तरीही यश मिळत राहते, त्याचे काय कारण ? तर हे यशनामकर्मामुळे आहे.

मी पुष्कळ लोकांना सांगतो, हे ज्ञान होण्यापूर्वी सांगत होतो की सांसारिक गोष्टींमध्ये मला नेहमी यश मिळत होते. मी सांगायचो की, 'भाऊ, यात मी पडलोच नाही, मी काही केलेले नाही, मला माहितही नाही आणि हे कोणी दुसऱ्याने केले असेल, म्हणून हे यश त्यांनाच द्या.' कारण मला माहित आहे की जे तुमचे यश असेल ते मला देऊन टाकले, तर तुम्हाला कोरडेच ठेवतील ना ? केले असेल तुम्ही आणि यश मला देतात. तुमच्या मनात कशी अपेक्षा असते ? तुम्हाला वाटेल की हा माणूस मला

यशही देत नाही. मी त्याला काय सांगतो की, 'हे कोणी दुसऱ्याने केले आहे, म्हणून तिथे जाऊन त्याला द्या.' तरीही म्हणेल, 'नाही, नाही, तुमच्याशिवाय तर हे शक्यच नाही. तुम्ही तर नेहमी असेच बोलता ना!' म्हणजे पुन्हा मलाच यश देऊन जातात. कसेही करून ते गाठोडे ठेवूनच जातात, आता त्याचे काय होईल? मी काय करू मग? यावर काही उपाय तर शोधावा लागेल ना? मग मी समजून गेलो की हे यशनामकर्म आहे.

**प्रश्नकर्ता :** मग त्या गाठोड्याचे तुम्ही काय करता?

**दादाश्री :** काही नाही. आम्ही अशी विधी करून त्यास पुन्हा फेकून देतो. कारण आम्ही ते ठेवत नाही, जरी आम्ही केलेले असेल तरीही आम्ही ठेवत नाही ना! कारण की आम्ही कर्ताच नाही, फक्त निमित्त आहोत. काय आहोत? निमित्त. हा हात लावला म्हणून काय, 'मी' हातही नाही आणि पायही नाही, हा तुझ्या कर्माचा उदय आला आहे आणि माझ्या हाताचा स्पर्श झाला. तुझे (दु:ख) मिटणार होते आणि माझा हात लागला. कारण की यश मला मिळणार होते की हे दादाने मिटवले. असे सर्व यश मिळते! तेव्हा मला म्हणतात की, 'तुम्ही करतातच ना हे?' मी सांगितले की, हे सर्व यशनाम कर्मच आहे. मी हे उघड केले. जे आत्तापर्यंत लोक उघड करत नव्हते की 'हे माझे यशनाम कर्म आहे,' लोक असे सांगत नाहीत. लोकांना तर तेव्हा चांगली मजा येते, आत जरा टेस्ट (आस्वाद) येत असते. 'तुम्ही माझे मिटवले' असे ऐकतात त्यावेळी त्यांना टेस्ट येते. म्हणून ही टेस्ट सोडत नाही. तेव्हा ही टेस्ट नाही सोडली नाही तर तो मोक्ष चुकतो! इथे रस्त्यातच मुक्काम केला म्हणून तो ध्येय राहूनच जातो ना!

हा तर माझा हात लागला की त्याचे काम होऊनच जाते. म्हणून त्याला असे वाटते की, हे दादांनी केले. दादा काही रिकामे नाहीत, असे सारे करण्यासाठी. दादा तर स्वत: जे सुख चाखत आहेत ते सुख तुम्हाला देण्याकरीता आले आहेत, आणि संसारातून मुक्ती मिळवून देण्यासाठी आले आहेत. स्वत: मुक्त होऊन बसले आहेत. स्वत: संपूर्णप्रकारे मुक्त होऊन बसले आहेत, तेच देतात, दुसरे काही देत नाहीत!

## हे रहस्य राहीले उलगडल्याशिवाय

आणि आपल्या इथे असेही घडते ना की, तुमच्यासारखा सुशिक्षत माणूस, सर्व प्रकारे विचारशील, तोही मला सांगतो की 'काल दुपारी साडे तीन वाजता तुम्ही माझ्या घरी आले होते. आणि साडे चार वाजेपर्यंत माझ्या घरी बसले होते. तुम्ही जो वार्तालाप केला त्याची मी नोंद केली आहे. नंतर तुम्ही निघून गेले, ही गोष्ट खरी आहे का? मी म्हणालो, 'खरी आहे!' मला मग हो म्हणावे लागते, पण मी तर गेलोच नव्हतो. नंतर मी विचारले, 'काय बोलले होते ते मला सांग.' तो मग सांगतो, 'असे बोलले होते.' तो माझेच शब्द दाखवतो.

**प्रश्नकर्ता :** पण ही तर सूक्ष्म शरीराची गोष्ट आहे ना, ही कुठे स्थूल शरीराची गोष्ट आहे ?

**दादाश्री :** नाही, त्याला हे स्थूल शरीर दिसते. हे तर माझ्याही मानण्यात येत नाही. ह्या अशा काही गोष्टी ऐकण्यात येतात, माझ्या नावाने कोणी देवता फिरत आहे की कोण फिरत आहे, हे समजतच नाही. कारण देवतांचा वैक्रिय स्वभाव, म्हणून जसा देह धारण करायचा असेल तसा धारण होतो. दादांसारखा देह धारण करतो, वार्तालाप पण तसाच करतो, सर्वच करतो. पण तरी मी त्यात काहीही केलेले नसते.

म्हणजे दिवसा ढवळ्या गप्पागोष्टी करतात. आता हे मी जाणत असतो की मी तिथे गेलो नव्हतो. पण 'दादा भगवान' तिथे जातात ही गोष्ट नक्की!

**प्रश्नकर्ता :** आणि 'ज्ञानीपुरुष' हे जाणत नाही, हे नक्की आहे का ?

**दादाश्री :** मी जाणत नाही, हेही नक्की आणि 'ते' फिरतात हेही नक्की.

आणि तिथे अमेरिकेवाले सांगतात ना, 'आज मला तीन वेळा विधी करवून गेले.' असे मला सांगतात देखील आणि मला त्यांचा फोनही येतो की आज रात्री 'दादा भगवान' येऊन तीन वेळा त्यांची विधी करवून गेले! म्हणजे हे तर खूप मोठे आश्चर्य आहे! तरीसुद्धा यात नाम मात्रही चमत्कार नाही.

**प्रश्नकर्ता :** पण आम्हाला तर आश्चर्य वाटणारच ना ?

**दादाश्री :** आश्चर्य वाटते, पण मी त्यास चमत्कार म्हणून स्वीकारत नाही.

म्हणजे यामागे काहीतरी आहे, समजणार नाही असे रहस्य आहे. बुद्धिगम्य रहस्य नाही, पण समजत नाही असे रहस्य आहे हे. पण मी यास चमत्कार म्हणू देणार नाही. चमत्कार म्हटले म्हणजे मी जादुगार ठरलो. आणि मी काय जादुगार थोडाच आहे ? मी तर 'ज्ञानीपुरुष' आहे. आणि शौचाला जाण्याचीही शक्ति माझ्यात नाही. ते 'दादा भगवान' काहीतरी रहस्य आहे, ही गोष्ट मात्र नक्की.

एक बाई स्वत: पोस्ट ऑफिस चालवत होती. ती सकाळी जेव्हा पोस्ट ऑफिसमध्ये गेली तेव्हा दोन लुटारु आत घुसलेले होते. जशी ती बाई आत गेली तशी त्या बाईला आणि तिच्या वीस वर्षाच्या मुलीला दोरखंडाने बांधले आणि मग म्हणाले, आता चावी दे. तेव्हा ती बाई काय सांगत होती ?

**प्रश्नकर्ता :** तीने सर्व देऊन टाकले आणि मग एकदम बसली. 'आता काय घडणार आहे ते मला माहित नाही. आता 'दादा भगवान' जे करतील ते खरे,' असे करून बसली. दुसरीकडे वीस वर्षाची तरुण मुलगी पण म्हणाली, 'मला कोणत्याही प्रकारची भीती वाटली नाही, अजिबात नाही, आणि दादा माझ्या समोर हजर झाले. मला दादांचा साक्षात्कार झाला.'

**दादाश्री :** इथे येऊन मला म्हणाली, पूर्ण जगात कुणाला साक्षात्कार व्हायचा असेल तेव्हा होईल पण मला तर तिथे साक्षात्कार झाला, स्वत: प्रत्यक्ष पाहिले, आणि हेच सांगण्यास ती इथे आली होती.

**प्रश्नकर्ता :** मग ती म्हणाली, दादांच्या दोन डोळ्यांमधून लाईट माझ्या डोळ्यात आले, दादांच्या डोळ्यात निव्वळ प्रकाश (तेज) होता! असे किती वेळेपर्यंत चालले ते मला माहित नाही, पण संपूर्ण जग विस्मृत झाले. पण तरीही मी कुठे आहे, कशी आहे, हे सर्व मला माहित होते. मी बेशुद्ध नव्हते आणि थोड्या वेळानंतर ते लुटारु येऊन म्हणाले, ही चावी लागत नाही. दुसरी चावी दे, काढ ती चावी. म्हणून त्या बाईने डोळे

उघडले. तेव्हा म्हणे, 'जो प्रकाश दादांच्या डोळ्यांतून माझ्या डोळ्यात येत होता, तोच प्रकाश मी लुटारुंच्या डोळ्यात जाताना पहिला. ते लोक घाबरले. त्या लोकांनी तोंडावर बुकानी बांधलेली होती, फक्त दोन डोळेच दिसत होते. आणि म्हणाली, माहित नाही, त्यांच्यात एकदम परिवर्तन झाले. ती बाई त्यांना म्हणाली, 'बघा भाऊ, हा तर टाइम लॉक (कुलूप) आहे. माझ्याजवळ दुसरे काहीच नाही. मला तर काहीच माहित नाही. जे काही आहे ते हेच आहे.' मी जे जे त्यांना सांगत होते, ते सर्व ते मान्य करत गेले. त्यावेळी पोस्ट ऑफिसमध्ये दहा लाख पाउन्ड होते. एकूण दहा लाख पाउन्डची नगद रक्कम होती, पोस्टात तर सर्व पैसे ठेवतात ना! आणि आठ-दहा हजार पाउन्ड तर ड्रॉवर उघडले की समोरच होते. पण ती बाई त्यांना म्हणाली की 'काहीच नाही.' म्हणून दुसऱ्या ड्रॉवरमध्ये फक्त सव्वाशे पाउन्ड होते, ते घेऊन निघून गेले. ही बातमी आठ-दहा दिवसांपर्यंत लंडनच्या पेपरात हेडलाईन्समध्ये आली होती.

**दादाश्री :** सगळे पेपरवाले हे छापतच राहिले!

## 'दादा भगवान' तर राहतात निर्लेप

या 'दादा भगवानांचे' नाव घेतात ना, त्यांचे प्रत्येक कार्य सफल झालेले आहे. यात यशाचा मी भागीदार आहे. हे माझे यशनामकर्म आहे, असे यशनामकर्म तर क्वचितच कोणाचे असते. बाकी संसारी यशनामकर्म असते, तर हे अमके लग्न करायचे होते, ते होऊन गेले. म्हणजे हे एक प्रकारचे यशनामकर्म आहे. असे मला या बाबतीत यशनामकर्म आहे. म्हणून 'दादा भगवान' 'मला' हे माझे यशनामकर्म पूर्ण करवितात. ते एक, दोन नाही, पण याहीपेक्षा मोठ्या-मोठ्या गोष्टी सांगतात लोक. पुष्कळ उदाहरणे पाहिली आहेत. त्यास हे लोक काय म्हणतात, 'तुम्ही चमत्कार करतात का?' मी म्हणालो, 'नाही, मनुष्य चमत्कार करू शकतच नाही. मनुष्याला बुद्धिने असे वाटते की हे चमत्कार करतात. पण जर त्याला शास्त्र समजत असेल तर यशनाम हे एक नामकर्म आहे.'

म्हणजे हे 'दादा भगवानांचे' काम आहे आणि यशफळ मला मिळत राहते. 'त्यांना' यश नको आहे. आणि यशनाम कर्म तर 'माझे'च ना!

**प्रश्नकर्ता :** 'दादा भगवान' नां तर कसले यश? ते तर निर्लेप आहेत ना?

**दादाश्री :** 'त्यांना' यश नसतेच. 'त्यांना' ती आठही कर्म नसतात. आठ कर्म सर्व माझी आहेत. ज्ञानावरण, दर्शनावरण, मोहनीय, अंतराय, नाम, गोत्र, वेदनीय, आयुष्य ही आठही कर्म 'माझी' आहेत.

**प्रश्नकर्ता :** 'माझी' म्हणजे कोणाची?

**दादाश्री :** ह्या 'ज्ञानीपुरुषांची'च ना!

## अक्रम विज्ञान हे सिद्धीचे फळ

**प्रश्नकर्ता :** कित्येकदा मला असे वाटत राहते की दादा जेव्हा हे ज्ञान देतात तेव्हा एका तासातच स्वत:च्या स्व-पदात आणून ठेवतात. यास काय म्हणावे?

**दादाश्री :** हा चमत्कार नाही.

**प्रश्नकर्ता :** तर हे वचनबळ म्हटले जाते?

**दादाश्री :** नाही, ही सिद्धी आहे. यास चमत्कार म्हणू शकत नाही. चमत्कार तर दुसरा कोणी करू शकत नाही. आणि हे तर माझ्यासारखा दुसरा कोणी अक्रम विज्ञानी असेल तो करू शकेल. जेवढे सिद्धत्व प्राप्त केले असेल तेवढे करू शकेल.

हे इथे जे होतात ना, असे चमत्कार नसतातच ना, एका मनुष्याला मोक्ष देणे ही काय अशी-तशी गोष्ट आहे! अरे, एका माणसाला चिंतामुक्त करणे ही पण काय अशी-तशी गोष्ट आहे! इतर सर्व ठिकाणी तर थोडा वेळ सत्संगात बसला असेल, आणि तिथून बाहेर गेला की परत तीच चिंता. जसा होता तसाच राहतो. आणि इथे तर कायमसाठी चिंतामुक्त होऊन जातो ना! तरी देखील तो चमत्कार नाही, सायन्स आहे!

आमच्या पुतण्याचा मुलगा काय सांगत होता की दादांना पाहताच आत्म्याला गारवा पोहोचतो. आत्मा तृप्त होतो. दादा तुम्हाला पाहताच

माझ्या आत्म्याला तृप्ती मिळाल्याशिवाय एक क्षणही जात नाही. फक्त एका मोतीला पाहिल्याने डोळे तृप्त होतात, म्हणून तर मोतीची किंमत आखली गेली आहे, तर 'दादा तुम्हाला पाहताच माझा आत्मा तृप्त होतो' अशी ज्याला समज असेल, तो कधी असे दुसरे चमत्कार शोधेल का?

म्हणून हे भाऊ सांगतात की हे 'दादा,' तर मोठमोठे चमत्कार करतात. हे जर पाहता आले तर खूप मोठे चमत्कार आहेत. वर्ल्डमध्ये घडले नसतील असे दादांचे चमत्कार आहेत, पण ते पाहता आले पाहिजे.

## इन्सिडन्ट एन्ड एक्सिडन्ट

**प्रश्नकर्ता :** सामान्य माणसाला सुद्धा जीवनात कित्येक वेळा चमत्कारिक अनुभव येत असतात, ते काय असेल?

**दादाश्री :** जगातील लोक ज्यास चमत्कार म्हणतात, किंवा मग या जगात चमत्कार म्हणजे 'अचानक घडून गेले' असे म्हणतात, म्हणजे त्यास एक्सिडन्ट म्हणतात किंवा चमत्कार म्हणतात. पण एन इन्सिडन्ट हेज सो मेनी कॉजेस एन्ड एन एक्सिडेन्ट हेज टू मेनी कॉजेस!' (एका घटनेच्या मागे कित्येक कारणे असतात आणि एका अपघातामागे बरीच कारणे असतात.) म्हणजे अचानक तर काही घडतच नाही! घडून गेले ते सर्व पूर्वीचे रिहर्सल झालेले आहे. आधी रिहर्सल झालेले आहे, तीच ही वस्तू आहे. जसे नाटकात आधी रिहर्सल करून मग नाटक करण्यास पाठवतात. त्याचप्रमाणे ह्या संपूर्ण जगाचे, जीवमात्राचे रिहर्सल पूर्वी होऊनच गेले आहे आणि त्यांनतरच हे सर्व घडत असते. म्हणून मी सांगतो की भीती बाळगण्यासारखी नाही. कारण जे घडणार आहे त्यात फेरबदल होऊ शकत नाही. नाटक सेट (तयार) होऊन गेलेले आहे हे!

**प्रश्नकर्ता :** मग त्या नाटकाचा डायरेक्टर कोण आहे?

**दादाश्री :** हे ऑटोमेटिकलीच होऊन जाते. हा सूर्य नेहमी एकच दिसतो, पण सूर्य तर बदलतच राहतो. (सूर्याच्या बिंबात राहणारे देवता बदलत राहतात) त्यांचे आयुष्य पूर्ण झाले की च्यवन (आत्म्याची दैवी शरीर सोडण्याची क्रिया) होते (बिंब सोडून देतात) आणि दुसरे देवता

आत प्रवेश करतात. म्हणजे ते आतून बदलतात आणि हे बिंब जसे आहे तसेच राहणार. असे रेग्युलर रुपाने प्रबंधित झाले आहे हे जग. एकदम रेग्युलर मांडणी झालेली आहे. कुणाला काही करावे लागेल असे नाही. जर भगवंत कर्ता झाले असते तर ते बंधनात आले असते.

ह्या जगात दोन गोष्टी नाहीत, त्या दोन गोष्टी दिशाभूल झालेल्या प्रवाहासाठी आहेत. ज्यास लोक म्हणतात ना की, एक्सिडन्ट झाला तर अशी वस्तूच नाही, ते दिशाभूल झालेल्या प्रवाहासाठी आहे. विचारवंतांसाठी एक्सिडन्ट हे नसतेच ना! आणि चमत्कार, यास सुद्धा दिशाभूल झालेला प्रवाहच मानतो, विचारवंत मानत नाही.

'एन इन्सिडन्ट हेज सो मेनी कॉजेस एन्ड एन एक्सिडेन्ट हेज टू मेनी कॉजेस!' अशाप्रकारे या चमत्कारात सुद्धा सो मेनी कॉजेस आहेत. कारण की कॉजेस (कारणां) शिवाय कोणतेही कार्य होत नाही, तर मग कॉजेस शिवाय चमत्कार घडले कसे ? हे सांगा ? त्याचा बेसमेन्ट पाहिजे!

म्हणजे हा चमत्कार आहे, ते जर असेच असेल तर त्याचे कॉज काय? ते सांगा. कॉज शिवाय वस्तू असू शकत नाही आणि जे होऊन राहिले आहे, चमत्कार घडतात तो तर परिणाम आहे. तर त्याचे कॉज सांग तू. म्हणजे हा तर आई-बापाविनाचा मुलगा ठरेल! म्हणून सगळे बुद्धिमान लोक समजून जातील की आई-बापाशिवायचा मुलगा असूच शकत नाही. ह्याने तर आई-बापाशिवायचा मुलगा तयार केला आहे!

**प्रश्नकर्ता :** म्हणजे हे तर ज्याचे कॉज माहित नसते त्यास चमत्कार म्हणतात.

**दादाश्री :** हो, त्यास चमत्कार म्हणतात, बस! पण पुन्हा हे लोक तसे ठसवतात आणि हे दुसरे लोक लालची आहेत, ते फसतात बिचारे!

## संयोगांचे मिलन, तिथे चमत्कार कसे?

म्हणजे चमत्कार कशाला म्हणतात? जर कोणाला तुम्हाला सायन्टिफिक रितीने प्रुफ द्यायचे असेल, तर ज्यात कोणत्याही वस्तुची, कोणत्याही संयोगाची गरज पडत नाही, त्यास चमत्कार म्हणतात. आणि

ह्या जगात संयोगाशिवाय कुठलेही काम होत नाही. कारण सर्व डिस्चार्ज संयोगाचे मिलन आहे, म्हणजेच सायन्टिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स आहे. कोणी म्हणेल की, 2H आणि O दिले तर मी तुम्हाला पाणी बनवून दाखविन. तेव्हा हा तर पाणी होण्याचा स्वभावच आहे. त्यात तू कसला आलास 'मेकर' (बनवणारा) मी तुला एक H आणि एक O दिला आणि जर तू पाणी बनवून दाखवलेस तर मी तुला मेकर म्हणेन. तेव्हा तो म्हणेल, 'ते बनणार नाही.' तेव्हा मी म्हणालो, 'नाहीतरी तू काय करणार होतास? उगाचच आपला!' म्हणजे हे संयोगांचे मिलन आहे! 'आता हे संयोग नसतील आणि तू केलेस, ते मला दाखव,' असे आपण म्हणावे. म्हणजे चमत्कार त्यास म्हणतात की त्यात संयोगांचे मिलन होता कामा नये.

आणि परत चमत्कार करणारा म्हणतो की आता या वेळेला होणार नाही!' 'का तू वेळेची वाट पाहतोस? म्हणून चमत्कार नाही.' पण असे विचारता येतच नाही ना लोकांना! मी तर त्याचे स्पष्टीकरण विचारले ना, तर त्याचे सांधेच तोडून टाकीन. कारण मला खुलासा मागता येतो! पण आपण का त्यांच्या मागे लागायचे? याचा मग अंतच येणार नाही. अनंत जन्मांपासून या आणि याच भानगडीत पडले आहेत. भगवंतांच्या काळात चौऱ्यांशी लाख विद्या होत्या, तर भगवंत त्या सर्व विद्यांचा नाश करून गेले. पण तरीही थोडे-फार लीकेज राहून गेले!! हे तर असे आहे की, खरे विज्ञान हरवले आहे, ते निसर्ग आपणहूनच बाहेर काढेल! आपण भाव करा ना, की ह्या चमत्कारांच्या सर्व विद्या जाव्यात इथून.

**जय सच्चिदानंद**

# वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामींना प्रार्थना

(दररोज एकवेळा म्हणायची)

हे निरागी, निर्विकारी, सच्चिदानंद स्वरूप, सहजानंदी, अनंतज्ञानी, अनंतदर्शी, त्रैलोक्य प्रकाशक, प्रत्यक्ष-प्रकट ज्ञानीपुरूष श्री दादा भगवानांच्या साक्षीने आपणास अत्यंत भक्तिपूर्वक नमस्कार करून, आपले अनन्य शरण स्विकारीत आहे. हे प्रभू ! मला आपल्या चरणकमलात स्थान देऊन अनंतकाळाच्या भयंकर भटकंतीचा अंत आणण्याची कृपा करा, कृपा करा, कृपा करा.

हे विश्ववंद्य असे प्रकट परमात्म स्वरूप प्रभू! आपले स्वरूप तेच माझे स्वरूप आहे. परंतु अज्ञानतेमुळे मला माझे परमात्म स्वरूप समजत नाही. म्हणून आपल्या स्वरूपातच मी माझ्या स्वरूपाचे निरंतर दर्शन करू अशी मला परम शक्ति द्या, शक्ति द्या, शक्ति द्या.

हे परमतारक देवाधिदेव, संसाररूपी नाटकाच्या आरंभ काळापासून आजच्या दिवसाच्या अद्यक्षणापर्यंत कोणत्याही देहधारी जीवात्म्याच्या मन-वचन-कायेच्या प्रति जे अनंत दोष केले आहेत, त्या प्रत्येक दोषाला पाहून, त्याचे प्रतिक्रमण करण्याची मला शक्ति द्या. त्या सर्व दोषांची मी आपल्यापाशी क्षमायाचना करीत आहे. आलोचना, प्रतिक्रमण, प्रत्याख्यान करीत आहे. हे प्रभू ! मला क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा. आणि माझ्याकडून पुन्हा असे दोष कधीही होऊ नयेत यासाठी दृढ निर्धार करीत आहे. त्यासाठी मला जागृति द्या, परम शक्ति द्या, परम शक्ति द्या, परम शक्ति द्या.

आपल्या प्रत्येक पावन पदचिन्हांवर तीर्थाची स्थापना करणारे हे तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी प्रभू ! संसारातील सर्व जीवांप्रति संपूर्ण अविराधक भाव आणि सर्व समकिती जीवांप्रति संपूर्ण आराधक भाव माझ्या हृदयात सदा संस्थापित राहो, संस्थापित राहो, संस्थापित राहो ! भूत, भविष्य आणि वर्तमान काळातील सर्व क्षेत्रांतील सर्व ज्ञानी भगवंतांना माझा नमस्कार असो, नमस्कार असो, नमस्कार असो ! हे प्रभू ! आपण माझ्यावर अशा कृपेचा वर्षाव करा की ज्यामुळे मला ह्या भरतक्षेत्रातील आपल्या प्रतिनिधी समान कोणी ज्ञानी पुरूषाचा, सत् पुरूषाचा सत् समागम होवो आणि त्यांचा कृपाधिकारी बनून आपल्या चरणकमलापर्यंत पोहोचण्याची पात्रता प्राप्त करू.

हे शासन देवी-देवता ! हे पांचागुलि यक्षिणीदेवी तसेच हे चांद्रायण यक्षदेव ! हे श्री पद्मावती देवी ! मला श्री सीमंधर स्वामींच्या चरणकमलात स्थान मिळविण्याच्या मार्गात कोणतेही विघ्न न येवो, असे अभूतपूर्व रक्षण प्रदान करण्याची कृपा करा आणि केवळज्ञान स्वरूपातच राहण्याची परम शक्ति द्या, परम शक्ति द्या, परम शक्ति द्या !



## संपर्क सूत्र

### दादा भगवान परिवार

**अडालज** : **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे, पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421. फोन : (079) 39830100

**राजकोट** : **त्रिमंदिर**, अहमदाबाद-राजकोट हाईवे, तरघड़िया चोकड़ी (सर्कल), पोस्ट : मालियासण, जि.-राजकोट. फोन : 9924343478

**भुज** : **त्रिमंदिर**, हिल गार्डनच्या मागे, एयरपोर्ट रोड. फोन : (02832) 290123

**अंजार** : **त्रिमंदिर**, अंजार-मुंद्रा रोड, सिनोग्रा पाटीया जवळ, सिनोग्रा गाँव, ता-अंजार. फोन : 9924346622

**मोरबी** : **त्रिमंदिर**, पो-जेपुर (मोरबी), नवलखी रोड, ता-मोरबी, जि-राजकोट, फोन : (02822) 297097

**सुरेन्द्रनगर** : **त्रिमंदिर**, लोकविद्यालय जवळ, सुरेन्द्रनगर-राजकोट हाईवे, मुळी रोड. फोन : 9879232877

**अमरेली** : **त्रिमंदिर**, लीलीया बायपास चोकडी, खारावाडी. फोन : 9924344460

**गोधरा** : **त्रिमंदिर**, भामैया गाँव, एफसीआई गोडाउन समोर, गोधरा, (जि.-पंचमहाल). फोन : (02672) 262300

**वडोदरा** : **त्रिमंदिर**, बाबरिया कोलेज जवळ, वडोदरा-सुरत हाई-वे NH-8, वरणामा गाँव. फोन : 9574001557

**अहमदाबाद** : **दादा दर्शन**, ५, ममतापार्क सोसाइटी, नवगुजरात कॉलेजच्या मागे, उस्मानपुरा, अहमदाबाद-380014. फोन : (079) 27540408

**वडोदरा** : **दादा मंदिर**, १७, मामानी पोळ-मुहल्ला, रावपुरा पुलिस स्टेशन समोर, सलाटवाड़ा, वडोदरा. फोन : 9924343335

| | | | |
|---|---|---|---|
| **मुंबई** | : 9323528901 | **दिल्ली** | : 9810098564 |
| **कोलकता** | : 9830093230 | **चेन्नई** | : 9380159957 |
| **जयपुर** | : 9351408285 | **भोपाल** | : 9425024405 |
| **इन्दौर** | : 9039936173 | **जबलपुर** | : 9425160428 |
| **रायपुर** | : 9329644433 | **भिलाई** | : 9827481336 |
| **पटना** | : 7352723132 | **अमरावती** | : 9422915064 |
| **बेंगलूर** | : 9590979099 | **हैदराबाद** | : 9989877786 |
| **पूणे** | : 9422660497 | **जालंधर** | : 9814063043 |

**U.S.A.** : **(D.B.V. I.)** +1 877-505-DADA (3232)

| | | | |
|---|---|---|---|
| **U.K.** | : +44 330-111-DADA (3232) | **UAE** | : +971 557316937 |
| **Kenya** | : +254 722 722 063 | **Singapore** | : +65 81129229 |
| **Australia** | : +61 421127947 | **New Zealand** | : +64 210376434 |

**Website : www.dadabhagwan.org**



## चमत्कार आहे तरी काय?

चमत्कार त्याच्या कारणांशिवाय घडला कसा, हे सांग. कारणांशिवाय कोणतेही कार्य होत नसते. चमत्कार घडतात ते तर परिणाम आहेत. म्हणजेच सायन्टिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स आहे. म्हणून तो चमत्कार नाही, ते सायन्स आहे.

\- दादाश्री



dadabhagwan.org



ISBN 978-93-86321-73-2
9 789386 321732
Printed in India

Price ₹20